

मनोहर ग्रंथमाला
प्रकाशन - ११४ वें

# तें माझें घर

मनोहर महादेव केळकर

नागपंचमी १८८४



प्रकाशक :
**मनोहर महादेव केळकर**
मनोहर ग्रंथमाला
टिळक रोड, पुणें २



मुखपृष्ठ :
**सौ. पद्मा सहस्रबुद्धे**

मुद्रक :
**चिं. स. लाटकर**
कल्पना मुद्रणालय, ‘ शिव-पार्वती ’
४६१।४ सदाशिव पेठ
टिळक रोड, पुणें २

**किंमत
तीन
रुपये**

# आठवण

गेलीं दहा वर्षे तें **माझें घर** हा लेखसंग्रह प्रकाशित करायचें डोक्यांत होतें. आज तो योग येत आहे. मी स्वतःच लेखक, स्वतःच प्रकाशक व बराचस मजकूर तयार असें असूनहि इतकीं वर्षे गेलीं म्हणूनच योग म्हणायचें. आमच्या कुटुंबांतील जिव्हाळ्याचा एक धागा अशा आमच्या आत्याबाई हें पुस्तक प्रसिद्ध होत असतांना आमच्यांत नाहींत हें मात्र राहून राहून मनांत येतें.

या संग्रहांतली '**दीपावलीची गुजगोष्ट**' मी १९४४ साली 'वाङ्मय शोभेच्या दिवाळी अंकासाठीं संपादकीय मजकूर हवा' असा व्यवस्थापक **बाबुराव इनामदारांनीं** तगादा लावला म्हणून लिहिली. दरवर्षी मी दिवाळीला घरीं जात असे. तो नेमका त्याच वर्षीं पहिल्याप्रथम गेलो नव्हतों. त्या अस्वस्थ मनःस्थितींत ती लिहिली.

मी विचारलें, 'काय लिहूं ? कांहीं विषयच सुचत नाहीं !' बाबुराव म्हणाले, 'कांहींतरी मनोगत म्हणून लिहा.' म्हणून त्या मजकुराला तेव्हां 'मनोगत' हें नांव दिलें होतें. इनामदार आज स्वतंत्र व्यवसाय करीत असले तरी आमच्यांतला **जिव्हाळा** कायम आहे आणि या पुस्तक प्रकाशनाच्या बाबतींतहि त्यांचें सहाय्य खूपच झालें आहे.

लिहिलेला मजकूर कुणाला तरी वाचून दाखवला म्हणजे कल्पना स्पष्ट व्हायला मदत होते असा माझा अनुभव आहे. माझे मित्र **श्री. वि. ग. कानिटकर** यांची अशी मदत नेहमीं होते. **श्री. लाटकर** यांनीं अनेक अडचणी बाजूस सारून अत्यंत आपलेपणानें पुस्तक उत्तम छापून दिलें. या दोन्ही गोष्टींचा उल्लेख करायलाच हवा. माझी घराबद्दलची कल्पना उत्तम रीतीनें व्यक्त करणारें असें मुखपृष्ठ आहे याची ग्वाही पुस्तक वाचल्यानंतर वाचकच देतील.

# अ नु क्र म



# स्पर्शे मन पालवतें !

मला प्रवासाची फारशी आवड नाहीं. कांहीं अंशीं धडधाकटपणाच्या अभावामुळें असेल पण कांहीं प्रमाणांत तरी घराच्या ओढीमुळेंच माझ्या हातून प्रवास घडत नसावा. दोन वर्षांपूर्वी एकदां मी गुजरातच्या प्रवासाला गेलों होतों. बरोबर अनेक समव्यवसायी असल्यामुळें वेळहि छान जात होता. नवीन गोष्टी पाहतांना मनहि रमत होतें. पण मनांत कुठेंतरी घरची आठवण दबा धरून बसलेली असायची. आम्ही सुरतेजवळचें पॉवरहाऊस पाहून अवशीस सुरतेस परतत होतों. अंधारांत भोंवतालचें कांहींच दिसत नव्हतें. फक्त दिव्याच्या प्रकाशांत समोरचा रस्ता दिसत होता. एके ठिकाणीं रस्त्यांत मला भास झाला कीं आमची गाडी पेरूगेट ओलांडून गेली आणि मला वाटलें घर आलें. पुढच्याच क्षणीं मी तंद्रींतून जागा झालों अन् माझ्या लक्षांत आलें कीं, आपण पुण्यांत नसून सुरतेंत आहोंत.

प्रवास संपवून आम्हीं रात्रीं अहमदाबादला गाडींत बसलों तेव्हांहि मनांत विचार हाच होता कीं, उजाडतां आपण मुंबईस म्हणजे जवळजवळ घरींच जाणार. कारण मुंबईस माझीं कितीतरी माणसें आहेत. मला दर महिन्याला कामासाठीं मुंबईला येऊन चार आठ दिवस राहावेंच लागते. मुंबईस माझीं नात्यांतलीं घरे अनेक आहेत आणि नात्यासारखींहि कांहीं घरें आहेत. शिवाय मुंबई, पुण्यापासून अगदीं जवळ ! मनांत आलें कीं, चार तासांत मी ' माझ्या घरीं ' जाऊं शकतो.

माझें पहिलें घर जळगांवला आहे. त्या घराला आम्हीं सगळीं भावंडें ' आमचें घर ' म्हणतों. आमचीं मुलं त्याला ' जळगांवचं घर ' म्हणतात. आमच्या घराजवळच्याच एका घरांत माझा जन्म झाला — कारण तेव्हां आमचं घर बांधून झालं नव्हतं — आमच्या घरांत मी केव्हां राहायला आलों तें मला आठवत नाहीं. पण साधारणतः वयाच्या पांचव्या-सहाव्या वर्षापासूनच्या कांही आठवणी मला आहेत. चित्रमयजगत् मासिक आणि त्याच्या पाठीमागच्या पानावर नेहमीं येणारी भल्लातकल्पाची जाहिरात मला चांगली आठवते. पहिल्या महायुद्धाच्या अखेरअखेर म्हणजे १९१७ सालाच्या अखेर आणि १८ च्या सुरुवातीस रिक्रूट गोळा करून त्यांना मिरवणुकीनें स्टेशनवर नेऊन गाडींतून रवाना करीत त्या वेळीं भुसावळच्या जोशी मामलेदारांच्याबरोबर, शिपायाच्या कडेवर बसून ' हिप हिप हुर्रे ' हा जयजयकार ऐकत मी स्टेशनवर गेल्याचें मला आठवतें. आमच्या दारांत दोन मांडव होते, सायलीचे वेल होते, खूप झाडें होतीं. त्यांत ईडलिंबाचें, आवळीचें व पारिजातकाचें झाड होतें तें मला चांगलें आठवतें. आवळीच्या झाडाखालचें आवळीभोजन मला आठवतें. पहाटें उठून आईला लक्ष वाहण्यासाठीं मी आणि कुसुम पारिजातकाचीं फुलें

गोळा करून देत असूं. झाडाखालीं पडलेला नाजुक फुलांचा तो सडा मला अजून डोळ्यांसमोर दिसतो.

आमच्या शेजाराला तारेपलीकडे चांदोरकरांचें घर होतें. तिथें चांदोरकर असतांना दर गुरुवारीं संगीत भजन व्हायचें. पुढें तिथून चांदोरकर केव्हां गेले अन् राजवाडे व बर्वे केव्हां आले तें आठवत नाहीं. पण म्युनिसिपालिटीचे चीफ ऑफिसर राजवाडे त्या घरांत खालीं राहात अन् वर कलेक्टरांचे चिटणीस बर्वे राहात, हें चांगलें स्मरतें. राजवाड्यांचा नाना[1] आणि बर्व्यांचा बापू[2] आणि मी एकत्र खेळलों, भांडलों, दुपारीं घरचीं माणसें झोंपल्यावर उन्हांत भटकलों, फिरत्या सिनेमाचा तंबू उठला कीं, तेथें हिंडून फिल्मांचे तुकडे गोळा केले. बर्व्यांची अक्का, राजवाड्यांची बेबी आणि माझी अक्का झोपाळ्यावर बसून उंच झोके घेत आणि गाणीं म्हणत. ज्यांच्या घरांत मी जन्मलों त्या कृष्णाबाई दलालांच्याकडे गेलों कीं, मला खाऊ नक्की मिळे, खांबेटे मामांच्या घरीं गेलों कीं, कोठी उघडून चार बदाम अन् दोन खारका माझ्या हातावर ठेवल्या जात अन् आमच्या धारूआत्याबाईच्या घरीं सातूचें पीठ खायला मी मुद्दाम जात असें.

या झाल्या घराभोंवतालच्या आठवणी. घरांत पाऊल टाकलें कीं पहिली आठवण होते आजीची—वडिलांच्या आईची. माझी स्मरणशक्ति कांहीं अगदीं उत्तम नाहीं. स्वप्नांत जशीं नांवें आणि माणसें यांची बघतां बघतां गल्लत होते तशी माझ्या लहानपणच्या स्मृति-

---

१ माझे हे स्नेही अतिशय हुशार होते. एल् एल्. बी. होऊन सेक्रेटरीएटमध्यें सुपरिंटेंडेंट झाले. पुढें घशाचा कॅन्सर होऊन दुर्दैवानें अल्पवयांत निधन पावले.

२ महाराष्ट्र राज्याचे आजचे अर्थमंत्री—स. गो. बर्वे.

चित्रांमध्येंहि गल्लत झालेली आहे. कांहीं व्यक्तिचित्रें धूसर झालीं असलीं तरी त्यांच्याबद्दलच्या आठवणी मनांत पक्क्या आहेत. आजीच्या आठवणींचें तसेंच आहे. एकाच घरांत राहूनसुद्धां आईवडिलांच्यापेक्षां आजीजवळच माझें लहानपण जास्त गेलें. प्रकृति कुरुमुरु अन् घरांत सगळ्यांत जिचा मान जास्ती अशा आजीचा मी लाडका असल्यामुळें घरांत माझ्या वाटेस फारसें कुणी जात नसे. माझाहि बराचसा वेळ आजीच्या भोंवतीं जाई. पहांटे लवकर उठायची संवय मला तिच्यामुळेंच लागली असावी. तिच्या देवावरील अपार निष्ठेमुळेंच—अध्यात्माचें किंवा घटपटादि खटा-टोपाचें फारसें आकर्षण नसतांहि देवाचें अस्तित्व आणि प्रार्थनेचें सामर्थ्य याविषयीं माझ्या मनांत श्रद्धा उत्पन्न झाली असावी. अगदीं पहांटे जाग आली म्हणजे आजी अंथरुणावर बसून भूपाळ्या म्हणत असलेली दिसायची. तिचीच शाल पांघरून मी भूपाळ्या ऐकत पडायचा. शांत वेळीं त्या भूपाळ्या चालू असतांनाच स्टेशनच्या बाजूनें पुलावरून येणाऱ्या बैलगाड्यांची खडखड केव्हांतरी ऐकूं यायची. आणि अजूनहि बैलगाड्यांची वर्दळ पहांटे कानीं आली म्हणजे मला ते दिवस आठवतात.

वडिलांनीं पेन्शन घेतल्यावर धुळ्याच्या गिरणींत त्यांनीं सतरा वर्षें नोकरी केली. आम्ही धुळ्यास असतांनाच २६ साली आजी वारली. तिचा धुळ्याला यायचा योग कधीं आला नाहीं तरी तिला भेटायला उन्हाळ्याच्या सुट्टींत मी पुण्याला जायचा. आणि आजीचं नांव उच्चारलं कीं पुण्याच्या घरांतली विहीर आणि तिच्या कांठचं नारळीचं झाड मला आठवतं. वयाच्या ८२ व्या वर्षीदेखील विहिरीचं पाणी स्वतः काढून ती आंघोळ करायची अन् आपलं लुगडं आपण धुवायची. आजी फार प्रेमळ होती पण फारशी बोलकी नव्हती. घरांत सगळीं तिला

वचकून असत. येवढे मोठे देशभर नांव गाजणारे तात्या, पण तेसुद्धां तिला फार मानीत. अशा त्या आमच्या आजीच्या वात्सल्याचा हात माझ्या अंगावरून फिरला. माझ्याच मुलांबद्दल नव्हे तर एकंदरींत लहान मुलांच्याबद्दल माझ्या मनांत जें प्रेम निर्माण झालं त्याचा उगम कदाचित् त्या स्पर्शांत असावा.

जळगांवचं घर सुटलं आणि धुळ्यास येऊन राहिलो. वास्तु बदलली तरी घडी तीच राहिली. आजोबांनीं आणि आजीनं वडिलांना व त्यांच्या बंधूंना अपार कष्ट सोसून मोठं केलं, शिक्षण दिलं आणि आमचं घर उभं केलं. आमचे थोरले काका अन् काकू डाव अर्ध्यावर टाकून देवाघरीं निघून गेले होते. पण त्यांचीं दोन मुलं दोन घरांत जाऊन हीं दोन घरं एकाच आईच्या मायेच्या छत्राखालीं नांदत होतीं. अप्पासाहेबांचं अन् तात्यांचं प्रेम शेवटपर्यंत कायम होतं. अन् आमच्या घरांत एक भाऊ चुलत आणि एक बहीण सावत्र आहे याचं ज्ञान आम्हांला कित्येक वर्षे झालं नव्हतं.

आजीच्या पाठोपाठ घरांतली आमची सगळ्यांची आवडती व्यक्ति म्हणजे आत्याबाई. स्वतःचं सर्वस्व गमावल्यानंतरहि भावाचं घर आणि मुलं आपलीं मानून आयुष्यभर सर्वांना सुखी करण्या-करतां झटणारीं अशीं देवमाणसं यापुढच्या काळांत आढळतील कीं नाहीं कुणास ठाऊक !

आई आणि वडील हीं तर घरांतलीं मुख्य माणसं. त्यांच्यामुळेंच घर उभं राहतं. आमच्या घराचे बाबतींतहि ते खरं होतं. पण माझं लहानपण आजीच्या मागेमागे गेलं आणि नंतर घरांत पाठोपाठचीं लहान भावंडं आणि घरांत नोकरचाकर पुष्कळ असत म्हणून संस्कारांच्या दृष्टीनें आईचा सहवास घडला तो पुष्कळ उशीरां. अप्पासाहेबांच्याबद्दल आम्हांला लहानपणीं

भीतियुक्त आदर वाटे. कांहीं हवें असलें तर तें आईमार्फत आम्ही मिळवीत असूं. तेहि घराच्या दैनंदिन कारभारांत पहात नसत. पण पुढें आम्ही जसजसे मोठे होत गेलों तसतसे त्यांच्या आमच्यांतलें अंतर तुटत चाललें. नाना विषयांवर चर्चा होऊं लागल्या, एकत्र ब्रिज खेळावयास बसूं लागलों, पण एकंदरींत ते अबोलच. आपलें काम, वाचन, रेडिओ यांत मग्न असत. आम्ही घरांत जमलों, वादविवाद, एकमेकांबद्दलच्या तक्रारी यांना रंग भरला म्हणजे ते आमच्या बैठकीजवळ येऊन गुपचुप उभे रहात, सगळें ऐकत व हळूंच विचारीत, 'पण मातोश्रींनीं निर्णय काय दिला ?' चर्चा गमतीची असली तर आम्ही सांगत असूं, तंटा असला तर सगळेच गप्प बसत होतो.

आणि त्यांचा आमच्यावर वचकहि तसाच होता. आणि तो अत्यंत आदरापोटीं होता. सज्जन, निर्व्यसनी, जिभेनें अपशब्दसुद्धां क्वचित् उच्चारणारे आणि रेव्हेन्यू खात्यांत अधिकाराचें काम जन्मभर करूनहि स्वच्छ राहिलेले. इतके कीं निवृत्तीनंतर एखाद्या जुन्या गांवांत गेले तर पाटीलतलाठी मेजवानी घालीत. एका पाटलानें तर त्यांच्यावर एक कवन करून पाठवलें होतें. त्यामुळें अजूनहि आमचे भावंडांचे मतभेद–वाद केव्हां विकोपाला गेले तर आम्ही त्यांचें स्मरण करतो आणि आमचे वाद मिटतात. घर या भावनेला माझ्या जीवनांत येवढें महत्त्व प्राप्त व्हायला आमच्या आईवडिलांचा सहवास, त्यांनी आचरलेला गृहस्थधर्म, लोकांना त्यांचेबद्दल वाटणारा आदर, त्यांचीं मुलं म्हणून समाजांत आम्हांला मिळणारी मान्यता यांचा फार परिणाम झाला.

घराविषयीं मला कुठलाच काल्पनिक आदर्श रंगवायचा नाहीं. आमच्या घरांतहि मतभेद, कडूपणा, अबोले वगैरे गोष्टी घडल्या; नाहींत असें नाहीं. पण त्या विकोपाला गेल्या नाहींत. आजहि

आम्हां भावंडांचे स्वतंत्र संसार आहेत, त्यांनाहि शाखा–उपशाखा फुटल्या आहेत, व्यवहारांत सगळ्यांचा सगळ्यांशीं दैनंदिन पत्र-व्यवहारांतहि राहणें कठीण आहे. आमची आई जळगांवच्या घरांत राहते. तेथें एक भाऊ असतो. आई केव्हांतरी चार दिवस आमचे येथें येते. आम्ही केव्हांतरी जातों. पण आमच्या प्रत्येक भावंडाच्या घरांत आईवडिलांचा फोटो आहे व तो आमच्यांतला दुवा आहे.

माझी सगळ्यांत थोरली बहीण नागपूरला होती. ती गेल्याला आज चोवीस वर्षे झालीं. तिचे यजमानहि दहा वर्षांखालीं गेले. तिचीं मुलं–मुली कर्तीसवरतीं आहेत. पण तिच्या मनांतली भावना तिच्या सगळ्या मुलांनीं उचलली आहे. मी नागपूरला बहीण गेल्यापासून गेलो नव्हतो. तो वीस वर्षांनीं गेलों. सगळ्यांचीं घरं स्वतंत्र. मुख्य घरांत तर तीन भावांचे तीन संसार होते. एका घरांत चहा घेत होतों, एकीकडे जेवत होतों, एकीकडे झोंपत होतों. एक भाची गांवांतच पण दूर राहते, तिच्याकडे जाऊन राहून आलों. पण एक दिवस प्रश्न निघाला, 'मामा उद्यां कोणाकडे जेवणार ?' रविवारची सुट्टी होती. तेव्हां सर्वजण मोकळे होते. मी सुचवलं, 'उद्यां मधल्या घरांतल्या माईच्या जेवणघरांत सगळेच एकदम जेवूं. माई असतांना जेवत होतों तसे ! प्रत्येकानें आपापल्या घरून एकएक जिन्नस करून आणा.' आणि मीं सुचवलं तें त्यांनीं आनंदानं मानलं. त्या वेळीं जांवई नव्हते. हीं मुलं पोरं म्हणण्याइतकीं लहान होतीं. पण आज त्यांचीं मुलं घरांत होतीं. जांवईसुद्धां या जेवणांत सहभागी झाले. रात्रीं अंगणांत सगळ्यांचा गप्पांचा कार्यक्रम झाला. सगळ्यांना अधूनमधून एकत्र आणणारी, परिस्थितिभेद व स्वभावभेद असूनदेखील आपलेपणानें जोडून ठेवणारी शक्ति म्हणजे माईची माया.

माई सगळ्यांची होती आणि सगळीं माईचीं आहेत ही भावना मात्र अजून कायम आहे.

अशा संस्कारांत वाढलेल्या मला घर म्हणजे केवळ अन्न, वस्त्र, निवारा पुरवणारे, चार भिंती आणि एक छप्पर असलेलें आश्रयस्थान वाटत नाहीं. चुना, सिमेंट, वाळू यांनीं वास्तु उभारली जाते. तिला घरपण येतें तें त्यांत राहणाऱ्या माणसांच्या एकतेच्या भावनेनें, त्यांनीं एका विचारानें केलेल्या कष्टांनीं, प्रेमाच्या देवाणघेवाणीनें आणि एकत्र भोगलेल्या सुखदुःखांनीं. घरांत देवघर हवं अन् तिथें नंदादीप हवा त्याचप्रमाणें घरांतल्या माणसांत एखादं तरी माणूस सगळ्यांना धरून ठेवणारं हवं. आणि त्या माणसाविषयीं सगळ्यांना जिव्हाळ्याचं प्रेम हवं. तेल वातींतून पुढं सरकत रहातं आणि नंदादीप तेवत राहतो तसं या एका माणसाच्या प्रेमाचं सामर्थ्य सगळ्या घरांत स्नेहभावाचा दीप तेवत ठेवतं. आपल्या परंपरेंत आईनं लालन करायचं आणि वडिलांनीं पालन करायचं ही प्रथा होती ती सर्वार्थानं उत्तम होती. आज समाजाची घडीच बदलल्यानं ही परंपरा ढासळूं लागली आहे पण नव्या परिस्थितींतसुद्धां त्यांतील रहस्य दृष्टिआड होतां कामा नये असं मला वाटतं.

नुकतंच मी Sisters of the Night नांवाचं एका अमेरिकन वार्ताहरानं लिहिलेलं पुस्तक वाचलं. त्या पुस्तकांत अमेरिकेंत सध्यां वाढत्या प्रमाणावर असलेल्या छुप्या वेश्याव्यवसायाच्या प्रश्नाची चौकशी लेखकानं केलेली आहे. असा व्यवसाय करणाऱ्या मुलींच्या मुलाखती मिळवून त्या त्यांत एकत्र छापल्या आहेत व शेवटीं निष्कर्ष काढायचा प्रयत्न केला आहे. पण तोहि निश्चित असा लेखकाला काढतां आलेला नाहीं. पण एक गोष्ट मात्र त्यानें निःसंदिग्धपणें सांगितली आहे ती ही कीं, या मुलींपैकीं

कुणालाहि चांगलं घर नव्हतं. चांगल्या सुखी घरांत त्या वाढल्या असत्या तर अशा झाल्या नसत्या. मनःपूत घटस्फोटांनीं खिळखिळ्या झालेल्या घरांतून वाढलेल्या या बहुतेक मुली आहेत. कुणाचा बाप सावत्र तर कुणाची आई सावत्र, घराला घरपण नाहीं, घरांत कुणी कुणाच नाहीं. अशा स्थितींत चांगल्या घरांतून होणारे सस्कार साहजिकच या मुलींना कुठले लाभायला?

हें वाचल्यानंतर माझा घर या सस्थेबद्दलचा अभिमान दृढ झाला आणि प्रेम दुणावलें. मुंबईस मी नेहमीं राहतो त्या भागांत एका रस्त्याच्या कडेला एका झाडावर एका हातगाडीवाल्यानें दत्ताची तसबीर लावली आहे. समोर दोन खिळे ठोकून त्यावर पणती ठेवली आहे. कित्येक वेळां मी त्या तसबिरीला हार घातलेला आणि ती पणती तेवतांना पाहिली आहे. त्या झाडाखाली फूट-पाथवर ती हातगाडी रात्रीं असते. जणुं काय तेथें त्यानें आपलें 'घर'च केले आहे. आज अनेक लोकांना दुर्दैवानें गृहहीन केलें आहे, पण सुसंस्कृत माणसाला घराची ओढ असते आणि ती असावी हे समाजाच्या अंतिम हिताचें आहे. घर ही सुसंस्कृत-पणाची खूण अन् आधारहि आहे.

माझी घराबद्दलची ही भावना म्हणजे केवळ स्वप्नरंजन नाहीं. ती मला तनमनानें जाणवते. मला केवळ घराच्या कल्पनेचेंच प्रेम नाहीं तर मातीचेंहि प्रेम आहे. या मातीलाच संस्कारांचा सुगंध लागून घरपणाची भावना निर्माण होते. अन्नवस्त्र मिळालं तरी माणसाची कुटुंब स्थापनेची भूक घरावांचून भागणार नाही. माणसांच्या शिवाय घराला घरपण नाहीं तसं घराशिवाय माणसांवर माणुसकीचे संस्कार होणार नाहींत. मी दर सुटीला पुण्याच्या घरीं जायचा. तिथून परत जातांना मी साऱ्या घरभर हिंडून घेत असे. तात्यांची खोली, आजीचं देवघर,

ताईचं स्वयंपाकघर, जिथं जिथं म्हणून मी मजेंत वेळ घालविलेला असेल तिथं एकदां जाऊन तिथल्या स्मृती जागृत करून त्यांत पुन्हा डुंबायची मला संवय होती. इंदूरचं कॉलेज होस्टेल जेव्हां अखेरचं सोडायची वेळ आली—वास्तविक मी इंदूरांत रहायला कंटाळलों होतों व तिथलें शिक्षण संपलें तेव्हां 'सुटलो एकदांचा' अशीच माझी भावना होती—तेव्हांहि मला वाईट वाटलें. कारण तिथें मीं दोन वर्षे काढली होतीं. त्या परिसराबद्दलहि मला प्रेम निर्माण झालं होतं. निघतां निघतां कॉटवर पुन्हा लोळलो, व्हरांड्यांत पुन्हा जाऊन उभा राहिलों, सगळा परिसर पुन्हा एकदां डोळ्यांत सांठवला. आदल्या दिवशीं तिथला नवलखा बाग, ज्याखाली मी अभ्यासाला बसत असे तें झाड, गणपतिमंदिर, इतकंच नव्हे तर ज्या दुकानांत मी अर्ध्या वाटेंत थांबून व्हिटोसो नांवाचं पेय पीत असे तें दुकान, या प्रत्येक आवडत्या ठिकाणीं मी जाऊन आलों होतों.

आणि हें वेड फक्त लहानपणींच होतं असें नव्हे. ज्या धुळ्याच्या गिरणींतल्या बंगल्यांत आम्ही सतरा वर्षे काढली तो बंगला सोडतांना मी पुण्याहून मुद्दाम चार दिवस घरीं गेलों होतों. या बंगल्यांत आमच्या घरचीं कितीक कार्यें झाली होतीं. भाऊचं लग्न, बाळची मुंज, बाबूची मुंज, अप्पासाहेबांचा एकाहत्तरावा वाढदिवस, कुसुमचं लग्न, माझं लग्न, बाळचं लग्न, याशिवाय मंगळागौरीचे समारंभ, दर वर्षीची दिवाळी! प्रत्येक कार्यांत मागच्या पुढच्या अंगणांत पडणारा मांडव, हिवाळ्यांत पेटणारी शेकोटी, गप्पांच्या बैठका, भांडणतंटे, एकमेकांवर प्रेम करणं, सगळं सगळं—शाळेपासून संसारांत पडेपर्यंत—त्या घरांत घडलं होतं.

जीं भाचरं अंगाखांद्यावर खेळविलीं तीं पुढें मोठीं झाली,

व्यवसायाला लागलीं, संसारी झालीं तरी प्रसंग आला किंवा फारा वर्षांनीं गांठी पडल्या म्हणजे पुन्हा एकदम लहान वाटायला लागतात. नलू डॉक्टर होऊन लांब जायला निघाली म्हणजे ती मोठी झाली आहे हें विसरायला होतं. कॉलेजांत ती आजारी पडून दवाखान्यांत गेली तेव्हां आम्ही पुण्यांत नव्हतों. गाडींतून उतरून घरीं आलों अन् नलूचा निरोप कळला. त्याच पावलीं दवाखान्यांत जाऊन नलूला भेटलों. तिच्या जवळ जाऊन उभा राहिलों अन् तिला विचारलं, ‘ एकाएकीं तुला काय झालं गं ? ’ अन् तिला एकदम भरून आलं. वास्तविक दुखणं किरकोळ होतं पण ती पडली मेडिकलची विद्यार्थिनी ? तिथल्या डॉक्टरनीं तिला लगेच आपल्या दवाखान्यांत येऊन निजून रहायला सांगितलं. ती घरीं सांगायला आली तर आम्ही नव्हतों. ती तशीच निरोप ठेवून दवाखान्यांत गेली. आम्ही येईपर्यंतच्या चार तासांत तिला कधीं नव्हे तें एकाकीपण जाणवलं असावं. मामा–मामींना बघतांच ते बांध फुटले. वास्तविक ती स्वभावानं किती कणखर. पण एखादी पावसाची सर अशीच अभावित नाहीं का येत ? मी तिचे डोळे पुसले, डोक्यावरून हात फिरवला अन् म्हणालों, “ अग, आम्ही आहोत ना इथं ! ”

आणि म्हणून नलू नोकरीसाठीं दूर जायला निघाली तेव्हां मला ती एकदम लहान वाटली. मी तिला जवळ घेऊन बजावलं ‘ लांब राहणार आहेस. स्वतःला जास्तींत जास्त जप हो ! अन् प्रवासांतसुद्धां काळजी घे. ’ वास्तविक नलू आतां माझीसुद्धां काळजी घेईल इतकी मोठी अन् कर्तृत्ववान् झाली आहे. पण कांहीं क्षण असे येतात कीं त्या वेळीं मधला काळ अन् अंतर विसरायला होतं. ज्या अदृश्य बंधनांनीं आम्हीं बांधले गेलों आहों त्यांची जाणीव होते आणि ती व्यक्त मात्र होते ती

स्पर्शानं. या स्पर्शानंच मन पालवतं, उत्कट झालेल्या भावना विसांवतात.

माझे वडील गेले त्याच्या आधीं पंधरा दिवस मी त्यांना अनुलक्षून ' तें माझें घर ' या नांवाचा लेख ' प्रसाद ' मासिकाकरतां लिहिला होता. जोशीबुवा मला म्हणाले, ' तूं तुझ्या वडिलांच्याबद्दल कां लिहीत नाहींस ? ' तेव्हा मीं सांगितलें, ' माझे वडील मला कितीहि मोठे वाटले तरी सर्वसामान्य वाचकाला त्यांच्याबद्दलचा मजकूर वाचण्याचें कुतूहल वाटावें असें सार्वजनिक जीवनांतलें मोठेंपण, त्यांच्या गांठी कुठें आहे ? पण जोशीबुवांना अशाच मोठ्या माणसांवर एक लेखमाला सुरू करायची होती. तोच या पुस्तकांतला प्रमुख लेख आणि त्याचेंच नांव मीं दिलें आहे या पुस्तकाला. ' असा मी तुमच्यावर लेख लिहितों आहे आणि तो प्रसादच्या जानेवारी ५३ च्या अंकांत यायचा आहे ' असें मीं वडिलांना कळवलें होतें आणि त्यांनींहि तो लेख वाचायला मागितला होता. त्याचें हस्तलिखित आणि प्रुफंहि माझ्या टेबलावर पडली होतीं. तीं पोस्टानेंहि पाठवतां आली असतीं. पण मी डिसेंबराच्या अखेरीस जळगांवला स्वतःच जाणार होतो म्हणून बरोबरच घेऊन जाऊं असें ठरविलें होतें.

पण तेंच चुकलें. पुढचें मला दिसलें नाहीं. घरीं जायला दोन दिवस उशीर झाला. घरीं पोंचायच्या आधीं अर्धा तास वडील गेले होते. मी अंतर्वैरी ठरलो होतों. दोन दिवसच आधीं त्यांची शुद्ध गेली होती. तेव्हां लेख यायला दोन दिवस उशीरच झाला होता. तो लेख प्रसादमध्यें आला आणि त्याच अंकांत माझ्या वडिलांच्या निधनाची वार्ता दिली होती. अनेकांना तो लेख वाचून तो मी वडील गेल्यावर लिहिला असें वाटलें. पुढचें स्पष्ट नसलें तरी अस्पष्टपणें मला जाणवलें असावें. म्हणूनच त्याचा सूर तसा

उमटला असल्यास नकळे.

आमच्या वडिलांबद्दल आम्हांला अत्यंत आदर व प्रेम असलें तरी आम्हीं कधीं त्यांच्या जवळ असें फारसें जाऊं शकत नव्हतो. गोंदवलेकर महाराजांची त्यांच्यावर कृपा होती आणि त्यामुळें कीं काय त्यांच्या स्वभावांत विलक्षण शांतपणा आला होता. ते स्नानानंतर पांच दहा मिनिटें संध्या करीत व देवाला फूल वाहत; पण या पलीकडे इतर अनेक वृद्ध लोकांप्रमाणें पोथ्यापुराणें वाचणें आणि तत्त्वज्ञानाचा काथ्याकूट करणें त्यांच्या स्वभावांत नव्हतें. ते क्लबांत जात, ब्रिज खेळत, रेडिओ लावत, वर्तमानपत्रें व चांगलीं पुस्तकें वाचीत. आम्हीं मुलें घरीं जमलो म्हणजे त्यांना आनंद होई, घरांतील एकंदर कार्यक्रमांत ते रस घेत पण त्यांचा बराचसा वेळ आपल्या उद्योगांत जाई. खूप बोलणें त्यांच्या स्वभावांतच नव्हते. पुढें आम्ही मोठे झालों अन् ते थकत चालले तसतसें आमच्यांतलें हें वरकरणीं अंतरहि कमी होत चाललें. कुणाकडून सेवा करून घेणें त्यांना आवडत नसे. पण आम्हांला ती करावीशी वाटे. पुढें त्यांचा इलाज चालेना तेव्हां तें आमची सेवा घेऊं लागलें. अन् आम्हीं सगळे — त्यांच्या सुनासुद्धां — अहमहमिकेनें ती करीत होतों. या घरच्या मुली लग्न होऊन गेल्या तरी मुलीच राहिल्या आणि घरीं आलेल्या सुनाहि मुलीच झाल्या.

हा विस्तार मुद्दाम करायचं कारण असं कीं, जेव्हां वडील गेले तेव्हां आतां ते पुन्हा भेटणार नाहींत, बोलणार नाहींत, कांहीं मागणार नाहींत या विचारांनीं डोक्यांत गर्दी केली. लहानपणीं मला रात्रीं झोंप येत नसे तेव्हां ते जवळ वर्तमानपत्र वाचीत बसत इत्यादि अनेक गोष्टी स्पष्ट आठवूं लागल्या. अन् शेवटचा कां होईना त्यांच्या पायांवरून, अंगावरून, डोक्यावरून हात फिरवावा अशी भावना मनांत प्रबळ झाली. त्यांना अग्नि देण्यापूर्वीसुद्धां मी

त्यांच्याजवळ जाऊन त्यांचे दोन हात हातांत घेतले अन् पायांना हात लावून नमस्कार केला. वास्तविक मी इतका भावनावश होणारा नाहीं. आणि म्हणूनच मला केव्हां केव्हां वाटे कीं मनुष्यदेहाच्या स्पर्शाचीहि आपली ओढ ही विकृति तर नव्हे? निरनिराळीं नातीं योग्य अंतर ठेवून संभाळावींत हें संस्कारांनीं मला शिकविलें होतें. असें असतांहि भावना अनावर झाल्या म्हणजे ही स्पर्शाची ओढ निर्माण कां व्हावी? मित्राच्या पाठीवर थाप मारण्यापासून लहान बालकाचें मस्तक अवघ्राण करण्यापर्यंत वेगवेगळ्या प्रकारांनीं ही ओढ व्यक्त होते. मुलगा कितीहि मोठा झाला तरी कॉलेजांतून घरीं आल्यावर एखाद्या दिवशीं तरी आईच्या मांडीवर डोकें टेकून पडावं असं त्याला वाटतंच.

मानसशास्त्रज्ञ स्पर्शाच्या या भुकेचें विश्लेषण कसेंहि करोत, शाश्वताच्या मागे लागलेले आणि सगळ्याच नश्वराचा धिक्कार करणारे तत्त्वज्ञ हा मानवी मनाचा दुबळेपणा मानोत—पण असं तरी मी कसं म्हणूं—कृष्णमूर्तींसारख्या साधुपुरुषानें देखील म्हटलें आहे: "एखाद्याला प्रत्यक्ष समागमापासून जो आनंद प्राप्त होईल तोच आनंद मला आवडणाऱ्या एखाद्या व्यक्तीच्या हाताला स्पर्श करूनहि मला लाभेल." याचा अर्थच असा नाहीं का कीं, मनुष्य कितीहि सुसंस्कृत असला तरी भावना व्यक्त करण्या-साठीं त्याला स्पर्शाचें माध्यम हवें असते. एका सत्पुरुषाची गोष्ट मला माहीत आहे. एकानें त्यांच्यापुढें दोन मधुर आंबे ठेवले. आणि ते खाण्याची विनंति केली. त्यांनीं ते स्वीकारून बाजूला ठेवले. कारण कांही कारणामुळें त्यांना त्या दिवशीं कांहीहि खावयाचें नव्हतें. पण तो भक्त नाराज झालेला पाहून त्यांनीं ते आंबे हातांत घेऊन त्यांचा वास घेतला आणि त्याला म्हणाले, 'बाळ हा आतां तूं कापून खाऊन बघ.' भक्तानें

तो आंबा कापला आणि चाखून बघितला. त्याला तो केवळ पोगईसारखा लागला. त्या सत्पुरुषानें त्याचा स्वाद केव्हांच ग्रहण केला होता. टिपूर चांदण्यांत मध्यरात्रीं सगळीकडे संपूर्ण शांतता असतांना आपण उभे असलों तर एखाद्या क्षणीं आपल्या चित्त-वृत्ती बहरून येतात. आणि एका अननुभूत आनंदाचा मनाला स्पर्श होऊन जातो आणि त्या स्पर्शानें मन पालवतें, वृत्ती केव्हांतरी विसांवतात.

हें सर्व जेव्हां मला आठवतें तेव्हां स्पर्शाची ओढ ही विकृति नाहीं याची खात्री पटते. आपल्या सामान्य माणसांची गोष्ट तर सोडूनच द्या, पण प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णालासुद्धां स्पर्शाचें महत्त्व किती वाटत होतं याचं वर्णन ज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्ञाने-श्वरीच्या अटराव्या अध्यायांत केलें आहे. ज्ञानेश्वर केवळ तत्त्वज्ञानीच नव्हते पण कवीहि होते; म्हणूनच माणसाच्या भाव-नांचें महत्त्व त्यांना आकलन झालें असावें. भगवन्तानें अर्जुनाला गीता सांगितली, पण ती त्याला आत्मसात व्हावी म्हणून त्याला आलिंगन देऊन जें त्याला शब्दांनीं समजायचं राहिलं असेल ते आपल्या पुण्यस्पर्शानें समजावून दिलें.

**मग सांवळा सकंकण । बाहु पसरोनि दक्षिण ॥**
**आलिंगिला स्वशरण । भक्तराज तो ॥**
**ऐसें जें कांहींएक । बोला बुद्धीसीहि अटक ॥**
**तें द्यावया मिख । खेवाचें केलें ॥**
**हृदया हृदय एक झालें । ये हृदयींचे तें हृदयीं घातलें ॥**
**द्वैत न मोडितां केलें । आपणां ऐसे अर्जुना ॥**





१

# आधारवड

पुण्याच्या रत्नाकर मासिकानं १९३२ साली तात्यांच्या षष्ट्यब्दपूर्ती-समारंभानिमित्त 'केळकर–अंक' प्रसिद्ध केला होता. त्यांत तात्यांचा 'अंधार वड' या कादंबरीचं पहिलं पान छापलेलं आहे. तें पान मला अतिशय आवडलं. ती कादंबरी अजून अपुरीच आहे. पण तेव्हांपासून 'अंधारवड' या नांवानं माझ्या मनांत घर केलं. त्या शब्दाच्या उच्चाराबरोबरच कुठल्या तरी भीषणरम्य कल्पनागुंफेत माझं मन प्रवेश करतं. आणि मग तो शब्दच मी मनोमय आळवीत बसतो. आमच्या कौटुंबिक जीवनांतील तात्यांच्या स्थानाबद्दल विचार करतांना माझ्या मनांत वटवृक्षाचीच कल्पना येते. पण ती अंधारवडाची मात्र नव्हे––पण आधारवडाची. आणि तें नांवहि मला मनापासून आवडतं. प्रचड वृक्षाच्या छायेखाली इतर लहान झाडें खुरटतात असें म्हणतात. पण आमच्या केळकरांच्या कुटुंबांत तात्यांच्या कीर्तिविस्तारानं इतर कुणाचेहि यशोमार्ग कुंठित झाले नाहीत. उलट

वडाच्या पारंब्या जमिनींत शिराव्यात आणि त्यांनीं मूळ धरतांच त्यांतूनच नवा वृक्ष फोंफावावा तसंच झालेलं आहे. आणि या नव्या झाडाला जर कांहीं मिळालं असेल तर तो या आधारवडाचा जीवनरसच.

आमच्या आजी आजोबांनीं अत्यंत कष्टाचा आणि काटकसरीचा पण तितकाच समाधानाचा आणि नेकीचा संसार करून आपले तीन मुलगे वाढवले. ते चांगले निघतील एवढीच फार तर त्यांची अपेक्षा असेल. पण संसाराच्या या डावाचं आपलं दान आपल्याला इतकं चांगलं पडलं असेल अशी मात्र त्यांना कल्पनाहि नसेल.

सगळींजणं पूर्ण मार्गाला लागेपर्यंत अप्पासाहेबांनीं संसाराचा बोजा संभाळला. पण त्याचा सगळ्यांनीं सदुपयोगच केला. आमच्या आजीनें तर केळकरांच घराणं थोर लौकिकाला चढलेलं आपल्या हयातींत बघितलें.

लेखन–भाषण–संभाषण यांतील कुशलता हें तर केळकरांच्या सगळ्या लौकिकाचें आदिकारण माझे थोरले चुलते नाना. ते काव्येतिहास-संग्रह नांवाच्या एका मासिकाचं संपादन करीत आणि ते अकाली निधन न पावते तर साहित्यक्षेत्रांत त्यांनींहि उत्तम लौकिक मिळवला असता. माझी आई गुजराथेंत जन्मली आणि थोडंफार तेथेंच शिकली. पण केळकरांच्या घरांत पाऊल टाकतांच मराठींतील पहिली स्त्री–नाटककार, कथालेखिका आणि व्याख्याती असा तिनें लौकिक मिळवला. आणि तात्यांचं नांव म्हणजे तर आमच्या कुटुंबाचा हुकुमाचा एक्काच. तात्यांनीं लिहिलेलं वाङ्मय जितकं विपुल, तितकंच गुणांनींहि श्रेष्ठ आहे. आणि पुढल्या काळांत ज्या वेळीं आजच्या राजकारणाचाहि विसर पडलेला असेल त्या वेळींहि मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत तात्यांचं स्थान अढळ राहील.

श्रीधर मला अनेक वेळां म्हणतो कीं, ‘आपल्या केळकर–

कुटुंबियांच्या बोटांतून रक्ताऐवजीं शाईच वाहात असली पाहिजे. कारण त्याशिवाय कांहीं आपल्या घरांतल्या इतक्या जणांना लिहायचा नाद लागला नसता!' आमच्या तात्यांनीं इतकं वीस हजार पानं वाङ्मय लिहिलं ना, तरी ते म्हणतात कीं, रोज एक पान रोजनिशी लिहायची मला संवय असती तर अजून दहा हजार पानं वाचण्या-जोगा मजकूर माझ्या हातून लिहून झाला असता. कारण रोज असे अनेक विचार डोक्यांत येतात कीं, त्यांतून एक पान मजकूर सहज लिहून व्हावा. आणि हा लिहिण्याचा आग्रह ते इतरांनाहि करतात. 'अमका तमका गृहस्थ किती विद्वान् आहे, काय सुरेख व्याख्यानं देतो!' असं म्हटलं म्हणजे ते म्हणतात, 'त्यानं कांहीं लिहिलं आहे का? त्याच्या विद्वत्तेचा जगाला कांही उपयोग होणार आहे का? लिहायचं मनांत आणल तर अगदीं सामान्य माणसाला देखील उत्तम आत्मचरित्र लिहितां येईल आणि वाचकांनाहि तें आवडेल. कारण प्रत्येकाच्या आयुष्यांत कितीतरी घडामोडी आणि प्रसंग येऊन गेलेले असतात. मनांत सांठलेलं लिहून काढायची बुद्धि मात्र पाहिजे.'

'प्रसंगीं अखंडीत वाचीत जावें' हा समर्थांचा उपदेश मनापासून कोणी आचरिला असेल तर तात्यांनींच. कुठल्याहि कठीण प्रश्नांची चटकन् उकल करणारी तीक्ष्ण बुद्धि, रसिकता आणि सूक्ष्म विनोददृष्टि यामुळें कुठलाहि विषय तात्या जितक्या लवकर समजून घेतात तितक्याच लवकर विशदहि करून सांगतात. एकदां देवघरांत मी संध्या करायला बसलों होतों. ताईनीं मला सांगितलं, 'हातांतलं घड्याळ तेवढं बाहेर काढून ठेव हो; त्याला चामड्याचा पट्टा आहे ना?' मीं उलट म्हटलं, 'तुम्हांला हरणाजिन, व्याघ्राजिन हीं चालतात, तें नाहीं वाटतं कातडं?' तात्या जवळच उभे होते. ते हंसत म्हणाले, 'अरे, असा प्रत्येक नियम घांसायला लागलं तर आपल्यालाच

बाहेर राहावं लागेल. कारण आपल्या अंगावर देखील कातडंच आहे. तेव्हां असं कीं, ज्याच्या ताब्यांत देवघर त्याचे नियम वाद न घालतां पाळावे.'

'हास्य-विनोद-मीमांसा' या ग्रंथाच्या लेखनाचें काम सुरू होतें. तेव्हां तर घरांत मोठी मौज असे. त्यांतल्या तात्त्विक विवेचनाचे दृष्टीनें तात्यांचें अनेक ग्रंथांचें परिशीलन चालूंच होतें, पण एरवींहि अनेक विनोदी प्रसंग, चुटके, कोट्या वगैरेंचा पंचनामा सारखा सुरूच असे. आतां स्वतः तात्यांनाच या गोष्टींत गोडी असल्यानें आम्ही मुलं नवीन नवीन कोट्या, चुटके वगैरे, ऐकलेल्या अगर वाचलेल्या, जेवतांना सांगत असूं. मग त्यावर प्रतिकोट्या झडत आणि हंशा होत असे. त्या वेळीं ज्ञानप्रकाशचा बातमीदार घरीं असता तर रोज त्याला कॉलमभर मजकूर 'कंसांत हंशा' घालण्याकरतां मिळाला असता. Tragic या शब्दाला एकदां प्रतिशब्द 'खेदक' असा कुणी सुचवला, तेव्हां साहजिकच Comic ला 'मोदक' असा शब्द दुसऱ्यानें सांगितला. त्यावर तात्यांनीं मग मोदक शब्द चूक नाहीं, पण योग्यहि नाहीं, तर प्रमोदक म्हणावें असा निर्णय दिला.

'मोदक'वरून आणखी एक गोष्ट आठवली. बापूजी अणे त्या वेळीं घरीं पाहुणे होते. गणेशचतुर्थीचा दिवस असावा म्हणून मोदक केले होते. आम्ही जेवायला बसलों त्याणि जम्नादास मेहता आले. त्यांना तात्यांनीं विचारलें, 'जेवायचें आहे का?' ते नको म्हणाले. त्यावर बापूजी म्हणाले, 'पाहा बरं, आम्हीं काय खातों आहोंत, हें मागाहून कळलं म्हणजे पस्तावाल. त्यावर त्यांच्या पानांतील मोदकांकडे पाहून जम्नादास म्हणाले, 'But the external evidence is not very convincing.' त्यावर तात्या म्हणाले, 'The external evidencc might be misleading and if you want to do justice you have to look to the internal evidence

and that you can't know unless you do justice to the dish itself.'

तात्यांच्या सहवासांत असतांना त्यांच्या स्वभावाचे आणखी देखील एक दोन पैलू मला बघायला मिळाले. 'टाईम्स'च्या एका युरोपियन बातमीदारानें त्यांची मुलाखत घेतली आणि त्यांतील फक्त आपल्याला सोईस्कर अशी अर्धीच मुलाखत छापली. पुनः चार दिवसांनीं कांहीं कारणाकरितां तो आला. तात्यांनीं त्याला या हात-चलाखीचा खुलासा विचारला. तेव्हां आपल्याच गुर्मीत, 'मी तुमच्या म्हणण्याला 'टाईम्स'मधून प्रसिद्धी दिली, हीच विशेष गोष्ट आहे; जागा होती तेवढा भाग मीं घातला.' असें तो म्हणाला. त्याबरोबर 'मला प्रसिद्धी देण्याकरितां माझीं स्वतःचीं दोन पत्रं आहेत. मला टाईम्सची गरज नाहीं; तूं येथून चालता हो. ज्या दिवशीं तूं चूक दुरुस्त करशील त्या दिवशीं परत माझ्याकडे ये.' असें सांगून तात्यांनीं त्याला बाहेरचा रस्ता दाखवला. तो मनुष्यहि चूक उमगला. त्यानें योग्य ती दुरुस्ती करतांच त्याला उलट चहाला थांबवून घेऊन तात्यांनीं आपल्या मनाचा सरळपणाहि दाखवला.

बापूजी अणे आणि तात्या यांचा स्नेह जवळून पाहायला मिळणें हीहि एक आमच्या भाग्याची गोष्ट आहे. बापूजी तर आम्हांला घरच्यापैकींच एक वाटतात. १९३३ सालीं ते कॉंग्रेसचे प्रेसिडेंट असतांना त्यांचा मुक्काम गांधीजींच्या पुण्यांतील वास्तव्यामुळें, दोन तीन महिने आमचेकडेच होता. तेव्हांपासून आतांपर्यंत मी पाहात आलों आहे कीं, राजकीय मतभेदामुळें त्यांच्या परस्परांविषयींच्या स्नेहादरांत थोडेंसुद्धां अंतर पडलेलें नाहीं. या स्नेहाचा उल्लेख नुकताच बापूजींनीं मोठ्या कौतुकानें एका व्याख्यानांत केला होता. त्या वेळीं मतभेद आणि स्नेह याबद्दल तात्या म्हणाले, 'आमचा

स्नेह हा अभ्रकाच्या पातळ पडद्याप्रमाणें आहे. त्यामुळें दोघांचे मतभेद कितीहि तीव्र असले तरी अभ्रकांतून ज्याप्रमाणें विजेचा प्रवाह जाऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें परस्परांच्या विचारांचें अंतर जरी त्या पडद्यांतून दिसत असलें, तरी त्यांचा एकमेकाला धक्का लागत नाहीं.' बापूजी स्नानसंध्याशील असे कडवे ब्राह्मण, तात्या त्या मानानें सुधारक; तरीहि तात्या हिंदुसभेचा पाठपुरावा करणारे तर बापूजी कॉंग्रेसचा पाठपुरावा करणारे; असे अनेक विरोध आणि विरोधाभास असूनहि या दोघांचा स्नेह मात्र अकृत्रिम असावा हेंहि कौतुकाचेंच नाहीं काय ?

तात्या एरवीं अगदीं संथ आणि शांत; पण माझ्या लहानपणीं मी एकदां त्यांच्या डोळ्यांत अश्रु उभे केले होते. ती गोष्टहि योगायोगानेंच घडली. आज सुमारें वीस वर्षं झालीं त्या गोष्टीला. पण मला तो दिवस अजून स्पष्ट आठवतो. उन्हाळ्याच्या सुटींत 'पुण्याच्या घरीं' राहायला जायचा पायंडा मी त्याच वर्षीपासून पाडला होता. पुण्याला राहायला जायची ओढ मला दुसऱ्या एका कारणानें असे. ते म्हणजे माझी आजी. ती त्या वेळीं पुण्याच्या घरीं असे. आणि साऱ्या बालपणच्या आयुष्यांत मी जर कोणावर मनापासून भक्ति ठेवली असेल, तर ती आजीवर. आणि तिची माझ्यावरची मायाहि तशीच अलोट आणि अद्वितीय होती. तिचं चित्र आक्कानं 'आई' या 'हंसऱ्या निर्माल्यां'त उत्तम रेखाटल आहे, हें खर. पण कुठल्याहि चांगल्या शब्दांनीं वर्णन करण्यापलीकडचं तिचं कर्तृत्व आणि माया होती. आमच्या दोन्ही घरचा एक नाजूक पण बळकट दुवा म्हणजे आमची आजी. आणि तिची सगळ्या घरांत माझ्यावर माया म्हणून मीहि घरांतला कौतुकाचा विषय होतो.

जसजसे सुटीचे दिवस संपत आले व धुळ्याला परत जायचा दिवस जवळ येत चालला, तसतसा मी रोज आजीला म्हणे, 'आजी,

आतां तुमच्याजवळ राहायचा एक दिवस कमी झाला. आतां तीनच दिवस उरले... आतां... दोनच दिवस उरले.' आणि मग जसा जायचा दिवस आला तसा मी मनांत अगदीं गडबडून गेलों. सकाळीं उठल्यापासून जेवण होईपर्यंत मी कसातरी वेळ काढला. जेवण करून कपडे घातले. बाहेर टांगा आला. आणि मी घरच्या पद्धतीप्रमाणें वडील मंडळींना नमस्कार केला. त्यांत फक्त आजीला वगळलं. आजी दारांत उभी होती. शेवटीं तिला नमस्कार करायला आलों मात्र आणि मनाचा बांध फुटला. ब्यायशीं वर्षांची माझी आजी एवढी करारी, मनानं खंबीर पण जवळ गेल्याबरोबर लहान मुलाप्रमाणेच रडूं लागली. आमचे तात्या संथ, कित्येक खरोखरी मोठे दुःखाचे प्रसंग त्यांनीं शांत मनानें सोसले, पण या प्रसंगीं त्यांचेहि डोळे भरून आले. जणुं कांहीं पुढें घडणारें आमच्याबरोबरच त्यांनाहि जाणवलें होतें.

योगायोग असा कीं, मी सहज म्हटलेले शब्द खरे झाले. आजीच्या सहवासांतले 'फक्त दोन दिवस उरले, आतां एकच उरला' म्हणून उच्चारलेले शब्द खरे झाले. मी धुळ्याला गेलों आणि तीनच महिन्यांनीं आजी स्वर्गवासी झाली. पण तो क्षण तात्याहि विसरले नव्हते म्हणूनच पुढें प्रत्येक सुटीत आजी नव्हती तरी 'पुण्याच्या घरीं' जायची माझी ओढ कायमच राहिली.

आपलं घर सगळ्यांना उघडं असावं, कुणालाहि आपली भेट घेतां यावी, कुणाचंहि होईल तें काम आपल्या हातून पार पडावं अशाच वृत्तीनें तात्या व्यक्ति आणि संस्था यांशीं वागत आले. या कामीं मतभेद त्यांच्या कधींहि आड आले नाहीत. उलट अनेक वेळां असं घडलं कीं, ज्यांनीं त्यांचा हेवा, द्वेष अगर मत्सर केला त्यांचं बरं करायची वेळ येतांच जवळच्यापेक्षां त्यांचंच त्यांच्या हातून अधिक बरं घडलं आणि म्हणून मी अनेक वेळां

त्यांना म्हटलेलें आहे 'तात्या, तुमचं शत्रुत्व पत्करलं तरच एखाद्याचं काम चटकन् होतं!' पण तें कसहि असो; त्यांच्या जीवनाचं मोल आजच्या राजकारणांत कांहींहि ठरो आणि उद्यांच्या वाङ्मयांत कांहींहि मोजलं जावो, आम्हां केळकर कुटुंबांतील मंडळींना तात्यांचं नांव हा एक जोडणारा धागा वाटतो. आमची आजी ही एक आमच्या घरगुती जीवनांत एकत्व राखणारी शक्ति, एक आधार, अशी आम्हांला वाटत असे. तसेच आमचे तात्या आमच्या कौटुंबिक जीवनांतील एक दुवा आणि सामाजिक जीवनांतील मोटा आधार वाटतात आणि म्हणूनच मी त्यांना ज्या वटवृक्षाची उपमा दिली त्याचं नांव आधारवड!

—दीपावली, १९४६





# २

## आधारवड उन्मळून पडला

आमच्या तात्यांना दिलेली आधारवडाची उपमा अत्यंत समर्पक होती हें मला नुकतंच पुनः एकदां पटलं. पण तें एका आत्यंतिक दुःखाच्या प्रसंगीं ! आणि तो प्रसंग म्हणजे तात्यांच्या निधनाचा ! गेल्या महिन्याच्या चौदा तारखेला सायंकाळीं ओंकारेश्वरावर तात्यांच्या मृण्मय देहाला अग्निसंस्कार करायला ज्या वेळीं हजारोनीं लोक जमले होते त्या वेळीं त्या समुदायासमोर भाषण करतांना श्री. प्र. के. अत्रे यांनीं त्यांना वटवृक्षाची उपमा दिली आणि नंतर दोन दिवसांनीं झालेल्या सभेत पंतप्रधान बाळासाहेब खेर यांनींहि त्यांना वटवृक्षाचीच उपमा दिली.

पण माझी उपमा समर्पक असल्याची ग्वाही शब्दांनीं मिळण्यापूर्वी सकाळींच ज्यावेळीं तात्यांची निधनवार्ता ऐकून मी 'पुष्करणी'-वर गेलों, त्या वेळीं तेथील दृश्य पाहून माझी मनोमन खात्री पटली कीं, तात्या खरोखरच आमचा आधारवड होते. घरांत शिरावयाचा

जो मधला दिवाणखाना होता त्यांतच अगदीं समोर तात्या, रात्रीं जसे खाली येऊन निजले तसेच शांतपणें निजलेले दिसत होते. आदल्या संध्याकाळीं मला ते भेटले तेव्हां त्यांची होत असलेली तगमगहि थांबली होती आणि त्यांचें बोलणेंहि थांबलें होतें आणि तें मात्र कायमचेंच ! आम्हांला पहिली गोष्ट हवी होती आणि दुसरी नको होती. पण दैवानें तें आमच्या हातांत ठेवलें नव्हतें !

मधल्या दिवाणखान्याला समोरच्या बाजूनें आंत जाण्यासाठीं दार आहे. दारासमोर एक लांकडी पडदा ठेवला होता. त्यापलीकडे माडीवर जायच्या जिन्याला लागून एक कॉट घातली होती. त्यावर रात्रीं तात्या निजले होते. तात्या रोज रात्रीं माडीवरच झोंपत असत, किंबहुना त्यांचा बराचसा दिवस वरच जात असे. चहा, आंघोळ व जेवण वगैरे नैमित्तिक गोष्टीकरतां खालून घंटेचें बटन दाबलें कीं तात्या खाली येत. उन्हाळ्यांत मात्र दुपारच्या वेळीं खालच्या मजल्यावरच्या त्यांच्या खोलीत आणि सायकाळीं बागेंत अगर अंगणांत त्यांचा वावर असे. ते अगदीं शांतपणें झोंपलेले दिसत होते. आणि उशापायथ्याशीं घरांतली सगळीं शहाणीसुर्तीं मोटीं माणसंहि जमून रडताहेत असं मीं पाहिलं तेव्हां मला क्षणभर त्याचा अर्थच कळेना. त्यांच्या निधनाची वार्ता मला सकाळीं ७॥ वाजतां कळली. आणि मुंबईला टेलिफोन करायला सांगून मी ताबड-तोब घरीं आलों होतों. पण तोंपर्यंत या वार्तेचा अर्थच मला उलगडला नव्हता असं मला वाटतं. आणि ही सगळी मंडळी तात्यांच्याभोंवतीं अश्रु ढाळतात असं मीं पाहिलं आणि तात्या शांतपणें निजलेले पाहिलें तेव्हां मला वाटलं कीं, तात्या एकदम उठून म्हणणार, ‘ काय वेडे आहांत रे ! तुम्हांला रडायला झालंय् काय ? म्हणजे मी काय थोडा जास्त वेळ झोंपूंहि नये काय ?’ पण पुढल्याच क्षणीं माझ्या लक्षांत आलं कीं रडणारे वेडे नव्हते तर

तात्यांच्या गुपचुप महाप्रयाणामुळें त्यांना खरोखरीच वेड लागण्याची पाळी आली होती !

अक्का, बापू, अण्णा तिथें होते, माझ्या तीन्ही भावजया तिथं होत्या, त्यांचीं मुलं होतीं. सगळीं दुःखी होतीं, पण त्यांची माउली–आमच्या ताई–तिथं होत्या, त्यांच्या दुःखाचं वर्णन कसं करणार ! ताई मुलानातवंडांची माउली असल्या तरी तात्यांची साउली होत्या. जुन्या सांस्कृतिक वळणामुळें व त्यांच्या आचारधर्मपरायण वृत्तीमुळें, तात्यांच्या सार्वजनिक जीवनांत त्या कमी दृष्टीस पडल्या असल्या तरी देव न मानणाऱ्या तात्यांच्या जीवनांत ताईची पुण्याई सांवली-सारखी त्यांच्या मागें होती यांत मला तिलप्राय शंका वाटत नाहीं. आणि तात्यांना देखील याची पुरेपूर जाणीव होती. सुमारें दोन तीन वर्षांपूर्वी आमच्या घरीं चोरी झाली आणि त्यांत ताईची नथ देवापुढें होती ती चोरीला गेली आणि नथ नाही म्हणून ताईचा नित्याचा देवधर्म अडला. पण एरवीं कधींहि व्यवहारांत न बघणारे तात्या, पण त्यांनीं मुंबईहून नथ नकळत मागवली व ती घरीं येणार त्या दिवशीं ही गोष्ट ते घरांत बोलले.

ताईचं दुःख पाहून मला भडभडून आलं. माझ्या अंतर्मनापर्यंत तात्यांच्या निधनाची वार्ता आतां मात्र पोंचली. मी तात्यांच्या पायाशीं गेलों आणि त्यांच्या पायावर डोकं ठेवलं. त्यांच्या उशागती आलों आणि त्यांच्या त्या भव्य कपाळाला आणि स्तब्ध छातीला हातांनीं स्पर्श केला. छे ! तात्या आतां माझ्याशीं बोलणार नव्हते ! मीं माझीं अनेक विषयांवरचीं मत त्यांना सुनावलीं तरी तीं शांतपणानं ऐकून घेऊन मध्येंच कांहींतरी मार्मिक शेरा देणार नव्हते, अगर जुनी आठवण सांगणार नव्हते. आज इतरांनींच केवळ त्यांच्या आठवणी काढून अश्रु ढाळायचे होते.

ताईना एक एक जुन्या आठवणी होत होत्या. तात्यांनीं

दिलेलीं आश्वासनं आठवत होती. पण तात्यांना मात्र सगळ्या गोष्टींचा जणुं विसरच पडलेला होता. ते आपल्याच निद्रेंत मग्न होते. हळूंहळूं माणसं यायला सुरुवात झाली. प्रत्येक नवीन येणाऱ्या माणसाला तात्यांना तशा स्थितींत बघून दुःखाचा उमाळा येई आणि तें बघून ताईचे रुढ पुनः अनावर होत.

माझ्या भावजया घरांत आल्या तेव्हां चौदा पंधरा वयाच्या असतील. आज त्या प्रत्येकीला या घरांत येऊन सुमारें पंचवीस वर्षें झालीं होतीं. या आधारवडाच्या छायेखालीं आल्यानंतर पंचवीस वर्षें तो अनेक अंगांनी अधिकाधिक विस्तृत आणि भव्य झालेला त्यांनीं पाहिला होता आणि दिवसगतीनें त्यांना तो अधिकाधिक आदरणीय आणि पूज्य होत गेला होता. आज त्यांच्या मुली व मुलं मोठीं झाली आहेत. आणखी दोन चार वर्षांनीं त्यांच्या सुना त्यांच्या घरीं येतील. आज त्यांचे सगळ्यांचे संसार स्वतंत्र आणि सुखाचे झाले आहेत. पण तरीदेखील तात्यांच्या निधनानं या सर्वांना आपले संसार पोरके झाल्यासारखे वाटत होते आणि तसं वाटलं तर नवल नाहींच. कारण तात्यांच्या नुसत्या अस्तित्वानं ‘पुष्करणी’ कांठोकाठ भरून वाहात होती. पुढारी असोत, मंत्री असोत अगर संस्थानिक असोत, या घरांशीं आल्यावर ते आपण होऊन वांकत आणि विनम्र होत तें केवळ तात्यांच्या व्यक्तिमत्त्वानं. जाणारा येणारा त्या घराकडे पाही आणि तें ‘केळकरांचं घर’ म्हणून आदरयुक्त कुतूहलान बाजूच्या झाडांनून आंत डोकावी, तें कुठं बांकावर बसलेले अगर बागेंत हिंडणारे ‘तात्यासाहेब’ दिसतात का हें पाहण्याकरतां! तें सगळं आज संपणार होतं. सायंकाळपर्यंत लोकगंगेचा एकदां शेवटचा महापूर येऊन मग सगळं संपणार होतं!

माझ्या पाठोपाठ माटे आले; मग अण्णासाहेब भोपटकर, बाबुराव गोखले वगैरे मंडळी आली; रेडिओला फोन केला.

स्मशानयात्रेची वेळ, मार्ग व कार्यक्रम ठरला आणि छापायला गेला. व्यवहारचक्राचीं चाकं हलूं लागली.

माणसं येत होतीं आणि जात होतीं. पण रोज सगळ्यांची हंसतमुखानं दखल घेणारे तात्या आज शांत पडून होते. डोळे मिटलेले आणि मुखावर भाव गाढ झोंपेचा. कुठलीहि विकृति मृत्यु त्यांच्या मुखावर निर्माण करूं शकला नव्हता.

**दिसो लागे मृत्यु परि न भिववूं तो मज शके**
**तयाच्या भेटीचें असत मजला ज्ञानचि निकें**

असें जे तात्यांनीं लिहून ठेवलें होतं तें अगदीं खरें होतें. त्या वेळीं आम्हांला ही कविता सांपडली नव्हती पण त्यांच्या त्या ओजस्वी स्तब्धतेचें राहून राहून कौतुक वाटत होतें. अकराच्या सुमारास कॉट जरा पुढें ओढली आणि मानेखालीं उशा देऊन तात्यांना किंचित् बसतें केलें; कारण मंडळी हार घालायला येत होती. त्यांचें तें किंचित् पुढें वांकलेलें मस्तक जणूं सुचवीत होतें कीं, ते मृत्यूला अभिवादनच करीत आहेत. 'हात जोडले आहेत, हांकेची वाट पाहात आहे' असें जे गतगोष्टींत त्यांनीं लिहून ठेवलें तें केवळ गद्यकाव्य नव्हतें. तें काव्य मरतां मरतांहि तात्यांनीं जगून दाखवलें होतें. त्यांचें तें किंचित् नत असल्यामुळें सबंध दृष्टीस पडणारे तुळतुळीत मस्तक आणि गोरेंपान तेजस्वी मुख पाहून हा कोणी राजयोगी तर समाधिस्थ झाला नाही ना असेंहि वाटत होतें; आणि तोच भाव अखेर दहनापर्यंत कायम राहिला होता.

कांही वेळानें सगळ्यांनीं ताईना कसेंबसें किंचित् शांत करून घरांत नेलें तर आत्याबाईनीं हलकल्लोळ केला. इतका वेळ घातलेला बांध फुटला. आणि मग आपलें दुःख गिळून ताईना त्यांचें सांत्वन करावें लागलें. जो तो आपल्या परीनें दुःखाला बांध घालण्याचा प्रयत्न करीत होता. पण तें मधूनच अनावर

होत होतें. सगळ्यांत मोठा बापू आणि सगळ्यांत लहान आमचा बाबू! दोघं एकमेकाजवळ बसले, एकमेकांचं सांत्वन करायला म्हणून जवळ आले आणि गळ्यांत गळा घालून रडूं लागले. संध्याकाळीं विठ्ठल आला आणि आपल्या मुलाला मिठी मारून ओक्साबोक्शी रडला. बाळ आला आणि ताईना भेटला. पुन्हा तोच प्रकार. सगळे समंजस शहाणे पण त्या क्षणाला सगळे वेडे झाले होते.

पण ही घरच्यांची गोष्ट सोडा. जे बाहेरचे आलेले त्यांचीहि तीच अवस्था! शेंकडों, हजारों माणसें ही बातमी ऐकतांच अंत्य-दर्शनाला येऊन गेली. त्यांत ज्यांचे थोडेफार प्रत्यक्षाप्रत्यक्ष ऋणा-नुबंध होते त्यांची अशीच केविलवाणी अवस्था झाली होती. जात नाहीं, पात नाहीं; स्त्री नाहीं, पुरुष नाहीं; लहान नाहीं, थोर नाहीं; गरीब नाही, श्रीमंत नाही; कुठलाहि भेद या येणाऱ्या मंडळींत करणं शक्य नव्हतं. कुणी नमस्कार करून जाई, कुणी पायांवर डोकं ठेवून जाई, कुणी हार घालून जाई, कुणी एखादा बरोबरीचा म्हातारा येई, तात्यांच्या तोंडाकडे टक लावून बघे आणि मोठ्यानें म्हणे, 'तात्या, गेलांत?', कुणी म्हणे, 'तात्या, भेटायला आलो होतो!' पण सगळ्यांना एकच उत्तर, 'मी समा-धानानें जातों आहे; तुम्ही कुणीहि शोक करूं नका. जा; परमेश्वर तुमचं भलं करो!'

सकाळीं कांहीं मंत्री येऊन हार घालून, वंदन करून गेले. बारा वाजतां 'प्रभात'च्या मंडळींनीं येऊन फिल्म घेतली. दुपारीं अत्रे येऊन हार घालून गेले. तात्यांच्या शवाकडे पाहात कपाळाला हात लावून बसले होते म्हणे! आणखी कितीक येऊन गेले. जे पूर्वी कधींच आले नव्हते ते येऊन गेले; ज्यांनीं बेलगाम टीका केली तेहि येऊन, साश्रु नयनांनीं परत गेले. मग ज्यांनीं ओव्या गायल्या त्यांचे डोळे पाणावले असले तर नवल नाहीं. तात्यांच्या चेहऱ्यावरील

शांत भाव कायमच होता. 'हा मृत्यु कीं ही समाधि' असें नांव दिलेला लोकमान्यांचा एक फोटो आहे; त्या फोटोंत लोकमान्य दिसतात तसें तात्या दिसत होते. त्यावेळीं घेतलेला फोटो आजहि ही गोष्ट सांगेल.

पहातां पहातां चार वाजले. ताई एकदां शेवटचें दर्शन घेण्याकरतां बाहेर आल्या. सदुसष्ट वर्षांचा सहवास त्यांना आतां अंतरणार होता. इतक्यांत मुंबईस असलेली मुलंमाणसं आली. पुन्हां एकदां मनःक्षोभाचा क्षण आला. पण ताईंचं धैर्य दांडगं. त्यांनीं एकदां तात्यांच्या छातींवर मस्तक ठेवलं, तात्यांच्या मुखाकडे अखेरचं बघितलं आणि तोंड फिरवून अक्काचा हात धरून त्या शांतपणें आंत गेल्या. शव घरांतून अंगणांत गेलं. इतक्यांत प्रधानमंत्री बाळासाहेब खेर इतर सहकाऱ्यांसमवेत आले. त्यांना दर्शन देऊन तात्यांनीं 'पुष्करणी' कायमची सोडली.

मी खिडकींतून येणाऱ्या जाणाऱ्या मंडळीकडे आणि जमलेल्या गर्दीकडे बघत होतो. कुठले कोण आणि कुठले कोण! पण त्यांच्या भावनेचें स्वरूप पाहून तात्यांनीं काय कमाई केली याचा मला कांहीसा बोध झाला. येथे सर्वांना मुक्तद्वार असे. येथें सर्वांची दाद लागे. मनोहर ग्रंथमालेकडून एखादी सवलत हवी असली तरी खेड्यापाड्यांतले भोळे भाविक या घरीं दाद मागत; य. गो. प्रकाशनानं एखाद्या पत्राचं उत्तर वेळेवर पाठवलं नाहीं म्हणून लोक येथें तक्रार करीत; आणि मग तीं सर्व पत्रं त्या त्या ठिकाणीं पोचविली जात. पण अशी गर्दी या घरांत कधींच झाली नव्हती. तात्यांच्या जवळ बुवाबाजीचं भांडवल नव्हतं आणि गर्दी संभाळायला लागणारं वैभवहि नव्हतं. आणि अलिकडे बहुतांशीं ते निवृत्तहि झाले होते. आणि म्हणूनच पुष्करणीवर अशी गर्दी मी कधीं पाहिली नव्हती. 'आज तात्या गेले,

आपल्यांतून कायमचे गेले ' असें कळतांच मात्र तेथें केवढी यात्रा लोटली होती.

पुष्करणींतून स्मशानयात्रा निघाली ती दोन्ही जिमखान्यांवरून लकडीपुलावर आली. साहित्य परिषद, महाराष्ट्र मंडळ, वाङ्मय-शोभा कार्यालय यांचे हार घेत घेत तात्या महायात्रेचा मार्ग आक्रमीत होते. खांदा देण्याची आणि शक्य ती अखेरची सेवा करण्याची लोकांत अहमहमिका लागली होती. सारे व्यवहार सकाळपासून आपण होऊन बंद झाले होते. स्मशानयात्रेच्या मार्गावर छपरावरून, गॅलऱ्यांतून जागा सांपडेल तिथें लोक अखेरच्या दर्शनाला थव्याथव्यांनी जमले होते. सारा गांव या महापुरुषाच्या दर्शनाला लोटलेला पाहून या महापुरुषाच्या घराण्यांत जन्म झाला म्हणून त्या अतीव दुःखाच्या क्षणीं सुद्धां धन्यता वाटत होती. वाङ्मय-शोभा कार्यालयाच्या जरा पुढें देसाई लॉजपाशीं दुसरा एक महापुरुष तात्यांच्या दर्शनाकरितां उभा होता. स्वातंत्र्यवीर सावरकर मुंबईहून दुपारच्याच गाडीनें आले होते. अत्यंत विकल मनस्थितींत साश्रु नयनांनींच तात्यांना हार घालून तात्याराव जड पावलांनीं महाराष्ट्र मंडळाकडे निघाले. तात्यांना थांबणं शक्य नव्हतं. सारा गांव थव्यथव्यांनीं रस्त्याच्या दुतर्फा दर्शनासाठीं उभा होता. तात्यांनीं जास्तीत जास्त लोकांकरतां शक्य तेवढें आयुष्यभर केलें होतें. यावेळीं लोक तरी कसे थांबतील! हारांवर हार पडत होते. ठिकठिकाणीं पुष्पवृष्टी होत होती. त्या सगळ्या सत्काराचा स्वीकार करीत; शेवटचा निरोप घेत तात्या गायकवाड वाड्यापाशीं आले. तात्यांना सगळ्यांत प्रिय असेल तर टिळकांचा केसरी! केसरी कार्यालयाचा निरोप घेऊन त्यांनीं सरळ स्मशानभूमीचा मार्ग धरला. त्यांनीं पंचमहाभूतांचें ऋण फेडण्याकरतां तनुत्याग केला होता. ती निष्प्राण तनुहि आतां अग्निनारायणाच्या स्वाधीन

करायला हवी होती. प्रसंग कितीहि कटु असोत, वेळ आली म्हणजे ते पत्करायलाच लागतात. याच देहाला काल अभ्यंग-स्नान घडलं होतं; पण आज त्याच देहाला जीवनयज्ञसमाप्तीचें निदर्शक अवभृतस्नान घडायचं होतं. रेडिओवरून बातमी सगळी-कडे पोचली होती. मुंबईपलीकडचीं माणसं येणं शक्य नव्हतं. वडील बंधु अप्पासाहेब तेहि आज येऊं शकत नव्हते. बंधुतुल्य बापूजी अणेहि रात्रीपर्यंत येऊं शकले नाहीत. भाग्याची गोष्ट एवढीच कीं तात्यांना 'गुरुवर्य' म्हणून संबोधणारे स्वातंत्र्यवीर सावरकर मात्र उपस्थित होते. सावरकरांनीं अखेरचा क्षण साधला हें तर खरेंच पण अग्नि द्यायला बापू, अण्णा जवळ असल्याचा तात्यांच्या आत्म्याला जितका आनंद झाला असेल तितकाच, किंबहुना अधिकच आनंद, तात्यांची गुणवत्ता, बुद्धिमत्ता आणि त्यांच्या जीवनाचं मोल यथायोग्य जाणणारे आणि या 'शमी वृक्षा'नें टिळकांचीं संभाळलेली शस्त्रास्त्रें अतुल धैर्यानें परजणारे स्वातंत्र्यवीर सावरकर मंत्राग्नि देण्यापूर्वी अभिवादन करायला हजर असल्यानें, तात्यांच्या विदेही आत्म्याला झाला असेल!

भाषण करायला जाण्यापूर्वी अतिशय थकलेले असे सावरकर खाली चिता रचली होती तेथें आले. जवळच शव आणून ठेवलं होतं; त्याच्याजवळ जाऊन ते थांबले. कांहीं क्षणच ते तेथें होते. भरून आलेल्या अंतःकरणानें, निःशब्दपणें त्यांनीं तात्यांचा निरोप घेतला. मनोमन ते दोन महापुरुष काय बोलले असतील तें त्यांचें त्यांनाच माहीत! पण तो देखावा मात्र अत्यंत हृदय-स्पर्शी होता. आणि माझें परम भाग्य म्हणूनच थोडा दुरून कां होईना तो मला पाहतां आला. मी टिळकांना अगदीं लहानपणीं एकदांच पाहिलें होतें. गोखल्यांचें नांव तर ऐकूनच माहीत. पण गोखल्यांच्या स्मशानयात्रेस टिळक हजर होते, तेव्हांहि असाच प्रसंग

घडला असेल असें वाटतें.

भाषणें झाली. मंत्राग्नि दिला गेला. तात्यांचा देह भस्मीभूत झाला; त्याला पुनरागमनहि नाहीं. आमचे प्रिय तात्या आम्हांला आतां पुन्हा दिसणार नाहींत या कल्पनेनें मन बधिर झालं होतं. बापूजी येतील; उद्यां आई आणि अप्पासाहेबहि येतील. पण त्यांनाहि तात्या आतां दिसणार नाहींत ही कल्पनाहि सहन होत नव्हती. रात्रीं घरीं येऊन निजलों. दिवसभराच्या थकव्यानें रात्रीं रोजच्यापेक्षांहि गाढ झोप लागली; पण पहांटें जाग आली. आदला दिवस आठवूं लागलों तर वाटलें आपण अजून स्वप्नांत तर नाहीं ना! काल सकाळीं उठलों तें किती प्रसन्न मनःस्थितींत. त्याच्या आदल्याच दिवशीं तात्यांना भेटून आलों. लेख आणला. तासभर गप्पा मारल्या. रात्रीं दिवाळी साजरी केली आणि काल सकाळीं ७॥ वाजेपर्यंत किती आनदांत होतों. पण तेव्हांपासून दैवगति बदलली. आनंद ओसरला. आणि कालचा तो सगळा दिवस! एक एक प्रसंग डोळ्यांपुढें उभा राहूं लागला. वाटलें, खास आपण स्वप्नांतच आहोत. म्हणून नीट डोळे उघडून भोंवतीं पाहिलें. त्या प्रसंगाकरितां बोलावलेले आप्तस्वकीय माझ्याभोंवतींच निजलेले होते. छेः! तें स्वप्न नव्हतें. स्वप्नांतहि नव्हतें तें घडलें होतें. मग बिछान्यावरहि चैन पडेना. उठलों, घराबाहेर पडलों. एका नेहमींच्या चहाच्या दुकानांत शिरलों. तिथला मॅनेजर तात्यांचा महान् भक्त! त्यानें सगळीं वर्तमानपत्रें घेतलीं होतीं तीं पुढें केलीं. मोठमोठे मथळे होते त्यांत. तात्यांच्या नांवामागें 'कै.' हें उपपद लावलें होतें. तें एक अक्षर पाहिलें मात्र आणि जखमेची खपली काढावी तसें वाटलें. डोळे भरून आले. समोर नीट अक्षरें दिसेनात. मुकाट्यानें उठलों आणि घरीं आलो.

रात्रीं आई आणि अप्पासाहेब आले. आई सांगत होती,

जळगांव रेडिओवर अप्पासाहेबांनीं बातमी ऐकली मात्र आणि लगेच त्यांची गत केविलवाणी झाली. ते लहान मुलासारखे रडले. त्यांच्याकडे बघवेना. पण इथें येईपर्यंत अप्पासाहेबांनीं तें दुःख गिळलें होतें. ते घरांत आले आणि त्यांच्याभोवतीं सगळींजणं जमली. वावटळीनें घराच एका बाजूचं कौलार उडाल तर घरांतलीं माणसं दुसऱ्या छपराखालीं यावीं तसं तें दृश्य दिसत होतं. ते आले ते प्रथम ताईच्याजवळ गेले आणि म्हणाले, ' दुर्गा, अजून मी आहे ना? तूं कांहीं आमच्या घरची केवळ सासुरवाशीणच नाहींस. तुला आठवतात ते लहानपणचे दिवस?' आणि तें खरंच होतं. आमच्या ताई जन्माला आल्या त्याच मुळीं केळकरांच्या शेजाराला. आणि त्या या घराच्या सून व्हायच्या हें आधींच ठरलेलं होतं. या सगळ्यांचं बालपण एकत्र गेलं होतं आणि म्हणूनच त्या पुढे तात्यांच्या सहधर्मचारिणी झाल्या तरी त्या आधींपासूनच अप्पासाहेबांनीं अंगाखांद्यावर खेळवलेली बहिण आहेत. ताईंना आज आभाळ फाटलेलं वाटतं आहे. पण त्यांच्या मनाच जर कुणी अंशतः तरी समाधान करूं शकेल तर ते फक्त एकटे अप्पासाहेबच.

दहाव्या दिवशीं तिलांजलि देऊन आलों. अप्पासाहेब येईपर्यंत कावळा पिंडाला शिवला नव्हता. अप्पासाहेबांनीं तिथं पाऊल ठेवलं आणि कावळा पिंडाला शिवला. कदाचित् या कल्पनाहि असतील; पण असं घडलं एवढं मात्र खरं!

अजूनहि मी पुष्करणीवर जातों तेव्हां अजूनहि असं वाटतं कीं, ' खरंच, वर तात्यांच्याकडं जाऊन आलं पाहिजे!' अजून असं वाटतं कीं, बाहेर बांकावर दिसत नाहींत पण ते बागेंत असतील! पण पांच मिनिटं थांबूनहि तें परिचित खाकरणं आणि ती परिचित हांक ' कसं काय हो ' हीं कानांवर येत नाहींत.

आणि मग खात्री पटते कीं, ‘छेः! आतां कुठली ती हांक. तात्या गेले हेंच खरं!’

आभाळ आलं नव्हतं. सोसाट वारं सुटलं नव्हतं. वादळहि झालं नव्हतं. पण आमचा आधारवड मात्र उन्मळून पडला होता. आम्हांला फक्त त्याच्या छायेचं सुख ठाऊक होतं. त्याचीं मुळं किती खोलवर गेली होतीं तें आम्हांला आतां समजलं. हा महान् वृक्ष किडला नव्हता, पोखरला नव्हता पण त्याच्या आयुष्याची दोरी तुटली आणि तो उन्मळून पडला. पण तो उन्मळून पडतांच किती ठिकाणीं जमिनीला तडे गेले, किती दूरवर धरणी हादरली तें बघून आश्चर्य वाटतं, अभिमान वाटतो.

वाङ्मयशोभा, दिवाळी अंक, १९४७





३

# दीपावलीची गुजगोष्ट

नवरात्र संपलेलें आहे. दसराहि उजाडला आणि मावळला. आणि आज दीपावली आपल्या दृष्टिपथांत आलेली आहे. दीपावलीच्या आगमनाच्या कल्पनेनं हिंदु मन उजळून निघतं, पुलकित होतं. अगदीं लहानपणची गोष्ट मला आठवते. दिवाळी संपून महिना दोन महिने झाले असतील नसतील, दिवाळींत खाल्लेल्या लाडू-करंज्यांची आणि उडविलेल्या फटाक्यांची आठवणहि बुजली नसेल तोंच आम्ही पुढची दिवाळी कधी येणार त्याचे दिवस मोजावयास लागत असूं. नवें पंचांग आलें कीं, यंदांची दिवाळी कधीं येते, ती सबंध चार दिवस आहे कीं त्यांत एखादा भाकड दिवस आहे ( कारण त्या दिवशीं फटाके बुडत ) याची आम्ही चौकशी सुरू करीत होतों. तें बालपण संपलेलें आहे, ते पुन्हां येणार नाहीं, या कल्पनेनें मन अनेकदां उदासहि होतें. तरी पण बालपणची ती खोड अजून गेलेली नाहीं. नवीन पंचांग

आलें कीं, यंदांची दिवाळी केव्हां येते, ‘ वाङ्मयशोभे ’चा दिवाळी अंक केव्हां काढतां येईल, आणि सर्व कामें हातावेगळीं करून दिवाळी साजरी करावयास घरीं केव्हां जातां येईल याची आतुरता लागून राहते. कारण एरवीं वर्षभर उद्योग-धंद्याकरितां दूरदूर पांगलेली आम्ही भांवडें चार दिवस तरी दोन खांबांच्या त्या घरांत एकत्र जमायचेंच म्हणून धडपडत असतों. कदाचित् अगदीं आदल्या रात्रीं एक दोन वाजतां मी घरीं पोहोचेन, रात्र अंधारी असल्यानें सगळीकडे सामसूम असेल, उद्यां दिवाळी म्हणून जागत बसलेल्या किंवा पहांटेच्या ऐवजीं अपरात्रीं उठलेल्या, एखाद्या नादी मुलानें उडविलेल्या फटाक्यांचा आवाज कानीं येईल. मी घरांत शिरतों तोंच ओट्याच्या पायऱ्यांवर रात्रीं लावलेल्या, पण आतां तेल संपल्यामुळें मालवलेल्या पणत्या दिवाळीच्या आगमनाची सूचना मला पुन्हा एकदां देतील. ओट्यावर अंथरूण पसरून माझा थोरला भाऊ—तो बहुधा दहाच्या गाडीनें आला आसावा—निजलेला मला आढळेल. आणखीन् प्रहराभरानें सगळीं उठणारच आहेत. कशाला आत्तांच कोणाला उटवा—अशा पोक्त विचारानें मीहि माझा होल्डऑल पसरून तिथेंच निजेन. किती वेळ तरी मला झोंप लागणार नाहीं. कारण कितीतरी स्मृति-तरंग मनांत उठत असतील, आणि मन त्यांच्याशीं रिकामपणीं चाळा करीत बसेल. त्यांतच केव्हां तरी माझा डोळा लागेल. पण थोड्याच वेळांत कोणी तरी मला हलवून उठवील. माझे मेव्हणे मला म्हणतील, ‘ वा राव, आज दिवाळी अन् झोपतां काय ? ’ मी जरा डोळे चोळतो तोंच त्यांच्याबरोबर हिंदुस्थानच्या अगदीं दुसऱ्या दिशेकडून आलेला पण त्यांना स्टेशनवर भेटलेला माझा धाकटा भाऊ पण दिसेल. एवढ्यांत आंत माज-घरांतला दिवा लागेल आणि दार उघडून आई बाहेर डोकावील तोंच आम्हां सगळ्यांना बघून तिच्या मुखावर मोहोरलेला आनंद

तिच्या हातांतील पणतीच्या उजेडांत आम्हांला स्पष्ट दिसेल. आमच्या बरोबरच जांवयांना पाहतांच थोड्या संकोचानें 'अरे, बाबुराव आले तर बाहेरच काय बसून राहिलांत; मला नाही का दार उघडावयास हांक मारावयाची ?' असें ती म्हणेल. त्यावर ते म्हणतील, 'मी अन् बाळ आतांच आलों; हा नाना आणि बाबा मात्र रात्रींच केव्हां तरी आलेले दिसताहेत.' इतक्यांत मागच्या अंगणांत तुळशीवृंदावनाजवळ लावलेल्या पणतीवर ताई-माईनीं फटाक्याचा केलेला पहिला मुहूर्त कानीं पडेल आणि आधींच दोन दिवस आधाडी मारून घरीं आलेले भाऊराव कमाताईला हाताशीं धरून आंतून दाराशीं येतील. त्यांच्या पाठीशींच फटाक्याचें टोपलें घेतलेला बाबू आणि त्यांच्या पाठीमागे कमा-बाबूचें दारूकाम पाहण्यासाठीं जमलेली घरांतील मंडळी दिसतील. आमच्या हास्यविनोदानें आणि फटाक्यांमुळें जागे झालेले अप्पासाहेब माडीवरून खालीं येतां येतां 'हं, मग कोण कोण आले आतांपर्यंत ? अरे ! सगळे आलेले दिसताहेत कीं ! काय बाळ, तुला देखील रजा मिळाली वाटतं ?' असं म्हणतील आणि मग त्या बोलण्यानें घरीं पोहोंचेपर्यंत केलेली सर्व दगदग आणि शीण नाहींसा झाल्यासारखा आम्हांला वाटेल. एखादं उत्तम गाणं रंगतां रंगतां योग्य वेळीं जाणत्यांकडून आणि नेणत्यांकडून अकस्मात् एकदम समाधानाची टाळी पडली म्हणजे गाणाऱ्याला केलेल्या परिश्रमाचं चीज झाल्यासारखं वाटतं, त्याच-प्रमाणें दैनंदिन जीवनाच्या आट्यापिट्यांत सुहृदांकडून कानीं पडणारे असले समाधानाचे शब्द किती सुखद असतात ! एवढ्यांत 'अरे, आज नर्कचतुर्दशी—आत्ता उजाडेल, त्याच्या आंत आंघोळी नाहीं कां करावयाच्या ? मग बसा गप्पा करीत,' असा आंतून आत्याबाई पुकारा करतील, आणि मग योग्य वेळीं पुढच्या बैठकी घेण्याकरितां आमची पहिली बैठक संपेल.

हें, मीं गेलीं कांहीं वर्षें थोड्याफार फरकानें पुनःपुन्हा घेतलेल्या अनुभवाचें शब्दचित्र रेखाटलें आहे. पण मला माहीत आहे कीं, ज्या ज्या ठिकाणीं ' घर ' म्हणून आहे, आणि आई-वडिलांनीं मुलांचं प्रेमान संगोपन केलं आहे, तेथें तेथें कालांतरानें आणि परिस्थितीनें एकमेकांना एकमेकांपासून दूर नेलं असलं तरी ही ओढ उत्पन्न झालेली असणारच आणि म्हणूनच ज्या वेळीं पुन्हा एकत्र येऊन चार दिवस एकमेकांच्या सहवासांत घालविण्याची आणि पूर्वायुष्यांतील अशा प्रसगांच्या सुखदस्मृतींची उजळणी करण्याची संधि माणसाला मिळते तेव्हां तेव्हां ती संधि घेण्यासाटीं तो उत्सुक असतो. दीपावलीचा मंगल सण हा अशी एक सुवर्णसंधि प्रत्येकाला देत असतो. मनुष्याच्या जीवनाची ही ओढ पाहिली म्हणजे निदान आपल्या हिंदु समाजापुरतं असं वाटूं लागतं कीं, आपल्याला खरी तळमळ या सुखाची आहे. कुटुंबजीवन आणि आपल्याच पातळीवरील आणि आपल्याशीं ज्यांचा नित्य सबंध येतो अशा कांहीं थोड्या कुटुंबांनीं जो समाज अगर जी जमात बनते तेवढ्यापुरतं सामाजिक जीवन, यापलीकडे आपली दृष्टि पोहोंचत नाही. ज्यांची दृष्टि पोहोचते त्यांच्या बुद्धीला कांही गोष्टी पटल्या तरी प्रत्यक्ष जगल्या जाणाऱ्या जीवनांत आपण, कुटुंब, आणि गरजेपुरता छोटासा समाज येवढ्याच गोष्टींचा समावेश होतो. स्वातंत्र्यासारखे महान् प्रश्न देखील आपल्या दृष्टीनें नैमित्तिक असतात. आपले दैनंदिन जीवन दिवसेंदिवस निकृष्ट होत चालले आहे. म्हणून केव्हां तरी स्वातंत्र्य मिळणें या जीवनाच्या उत्कर्षाकरितां म्हणून अवश्य आहे, असें आपणांस वाटतें. आणि म्हणूनच ' फोडा आणि झोडा ' हें तत्त्व या देशांत प्रभावी टरू शकलें. राजकारणांतील या प्रश्नाशीं सध्यां आपणांस कर्तव्य नाहीं. फक्त

विषयानुरोधानें आपल्या सुखी जीवनाच्या कल्पना आणि त्याच्या मर्यादा सांगितल्या आहेत येवढेंच. आपली सुखाची कल्पना अशी कांहीशी संकुचित असली तरी, ती हलक्या दर्जाची मात्र खास नाही. उलट मला वाटतं कीं, ती अत्यंत बहुमोल आहे. कारण मनुष्याच्या कल्पना व्यक्तिस्वातंत्र्यापासून मानवतेच्या स्वातंत्र्या-पर्यंत प्रगल्भ होत गेल्या आणि कालांतरानें सर्व मानवता स्वतंत्र झाली तरी, शेवटीं त्या स्वातंत्र्याच करायच काय असा प्रश्न पुढें उभा राहीलच. आणि त्याच उत्तर शेवटीं प्रत्येक मानवाला त्याची बुद्धि, भावना आणि इच्छा यांना योग्य वाव मिळून त्यानें आपलें जीवन सफल करावें असेंच मिळेल. व्यक्ति-जीवनाचें खरें साफल्य कुटुंबजीवनाशिवाय होऊं शकणार नाहीं असें हिंदु समाजाला हजारों वर्षांच्या अनुभवानें माहीत झालें आहे.

आज अनेक देशांत कुटुंबसंस्था विस्कळित झालेल्या आपण ऐकतों. कांहीं ठिकाणीं कुटुंब आणि घराणीं यांचा कौटुंबिक स्वार्थ पराकोटीला जाऊन त्यांनीं बहुजनसमाजाला पायाखाली तुडविलें आणि त्याची प्रतिक्रिया झाली ती, कुटुंबसंस्थाच नाहीशी करावी अशी. ही प्रतिक्रिया रास्त असली तरी ती देखील पराकोटीला जाऊं शकत नाही. मनुष्याच्या बऱ्याचशा भुका भागविण्याच आणि त्या योग्य प्रमाणांत नियंत्रित करण्याच कुटुंब हें मोठं साधन आहे. आणि म्हणूनच कुटुंबसंस्था सुस्थिर आहेत तिथें त्या तशा राखणें आणि नसतील तेथें सुस्थिर करण्याचा प्रयत्न करणें अत्यंत जरूरीचें आहे. सुदैवानें हिंदु समाजांत कुटुंबसंस्था भरभक्कम पायावर उभी आहे. चांगले संस्कार आपण आपल्या घरांतच ग्रहण करतों. दुसऱ्यावर प्रेम करणं, दुसऱ्याकरितां त्याग करणं, इत्यादि गोष्टी आपण घरांतच शिकतों. सुदैवानें आज

आपल्याला नवीन सामाजिक दृष्टि येत आहे. आपल्याप्रमाणें इतरांनाहि सुखी होण्याचा पूर्ण हक्क आहे, हें तत्त्व मान्य झालें आहे. श्रेष्ठ कुळांत जन्मलो म्हणून मी श्रेष्ठ, या कल्पना जात चालल्या आहेत. फक्त संघटना म्हणजे काय हें मात्र अजून आपणांस कळलेले नाहीं. मी दुसऱ्याच्या सुखावर आक्रमण करणार नाहीं ही न्यायाची एक बाजू झाली. पण त्याचप्रमाणें माझ्या कुटुंबाच्या आणि ज्या अशा कुटुंबांनीं माझा समाज आणि माझे राष्ट्र बनले आहे, त्यांच्या हक्कावर मी तसूमात्र आक्रमण होऊं देणार नाहीं, ही वृत्ति आपल्यांत पूर्णपणें बाणावयाची आहे. दुसऱ्यांच्या हल्ल्यांनीं आमचा नायनाट झालेला नाहीं व होणार नाहीं. पण आम्हीच आमचे शत्रू झालों तर आम्हांस कोण वांचवूं शकेल? आज पाहिलें तर सुशिक्षित हिंदु मनुष्य हा व्यवहारांत फक्त स्वतःपुरतें पाहणारा, आणि व्यापक तत्त्वज्ञानाच्या गप्पा मारतांना जगांत कोणालांहि हार न जाणारा असा आहे. पण त्याचा परिणाम मात्र विपरीत झाला आहे. निदान यापुढें तरी आपण असा निश्चय केला पाहिजे कीं, ‘ फोडा आणि झोडा ’ हें तत्त्वज्ञान आमच्या समाजांत तरी यापुढें आम्हीं प्रभावी होऊं देणार नाहीं. माझें घर जसें माझ्या सुखासमाधानाचें केंद्र आहे, तशी माझ्या बांधवांचीं घरें झालीं पाहिजेत. माझ्या सुखांत कमतरता भासूं लागली म्हणजे मग मी जागा होऊन जागतिक पुनर्घटनेच्या गोष्टी बोलूं लागतों. त्याऐवजीं अफाट पसरलेल्या पण विस्कळित झालेल्या माझ्या समाजाची संघटना करण्याकरितां मी माझा कांहीं वेळ घालवीन; माझ्या निकटच्या बांधवांचीं सुखदुःखे समजून घेण्याकरितां त्यांच्याशीं मी समरस होण्याचा प्रयत्न करीन. सुदैवानें संघटनेचीं सूत्रें सांगणारे पुढारी आपल्यांत झाले आहेत, होत आहेत. स्वतःच्या नैष्ठिक जीवनानें आणि लोकसेवेनें जनतेचीं

मनें मारून टाकणारे महात्मे आपल्या डोळ्यांसमोर वावरत आहेत. अशा वेळीं मनांत आणलें तर आपल्यालाहि कार्यप्रवण होतां येईल.

दीपावली हा वद्य पक्षांत येणारा सण आहे. पहिल्या दिवशीं नरकासुराचा वध झाला अशी कथा आहे. दुष्ट कल्पना आणि रूढी निकालांत काढल्याशिवाय नव्या कालाला योग्य अशा जोमदार नव्या कल्पना आपल्याला पत्करतां येणार नाहींत. दुसरा दिवस लक्ष्मीपूजनाचा. त्या दिवशीं गेल्या वर्षांतील हिशेब तपासून, संग्रहित केलेल्या संपत्तीचा आढावा घेऊन तिचें पूजन करावयाचें असते. आणि नंतरच्या दोन दिवसांत पत्नी आणि भगिनी यांचेकडून ओवाळून घेऊन कुटुंबांतील स्नेहबंधनें आपण अधिक दृढ करीत असतो. आणि या दिवाळीच्या चारहि दिवशीं अंधःकार, पणत्या आणि आकाशदिवे लावून आपण उजळीत असतों. आणि जणूं काय निष्ठेनें चार दिवस हें अंधार उजळण्याचें आनंदाचें व्रत आपण पार पाडलें म्हणजे द्वितीयेची चंद्रकोर दिसून आपण उजळलेल्या प्रकाशांत भर घालण्याकरितांच ईश्वरानें हा आकाशदिवा उचावला आहे कीं काय अशी रम्य कल्पना मनांत येते.

वाङ्मयशोभा, दिवाळी अंक, १९५४





४

# आमच्या आत्याबाई

हा मथळा मीं मुद्दाम हेतुपूर्वक दिला आहे. मला जर माझ्या आजीवर लिहायचं असतं तर मी म्हटलं असतं, ' माझी आजी '. कारण, नात्यान जरी ती सर्वांची आजी होती तरी सर्वस्वानं ती माझी आजी होती आणि मी तिचा नातू होतों. पण आत्याबाई मात्र सर्वांच्याच आहेत. पण म्हणजे कांही त्या कुणाला कमी प्रिय आहेत असं नाहीं किंवा त्यांना कुणी कमी आवडतं असं नाहीं. त्या सगळ्यांना हव्याशा आहेत आणि त्यांचं हळुवार मन अमक्या एकाकरितां हळवं होत नाहीं असं नाहींच.

त्यांचं प्रेमच तसं आगळं आहे. त्यांच्या अंतःकरणांतील माया सदैव दुथडी भरून वाहात असते आणि अंतःकरण कुणाकरितां तरी तुटत असतं. आणि मला वाटतं असंच कुणाकरितां तरी तुटत राहावं हा त्यांच्या मनाचा स्थायीभाव आहे. असं न घडेल त्या वेळीं तें बंदच पडलेलं असेल. आणि बंद पडल्या-

नंतरहि तें कुणावर तरी मायेची पांखर घालायला पुन्हां अवतार घेईल.

लिहितां लिहितां मी कुठं तरी भरकटत चाललों. मला वाटतं, माझासुद्धा हा स्वभावधर्मच आहे. मुद्रितें तपासून आणि भाराभार साहित्य दुरुस्त करून माझी लेखणी रुक्ष झाली आहे. त्यामुळें स्वतंत्र कांही लिहायचं म्हटलं कीं ती अडूं लागते. पण असा मनामध्यें फार दिवस घर करून राहिलेला विषय लिहायला मुहूर्त लागला म्हणजे कांहीं वेळां ती मनःपूत धांवूं लागते व मी असं कांहीं तरी लिहून जातों; आणि मग माझ्यांतला संपादक जागा होऊन म्हणतो, ' जरा सबूर ! ' पण ' आमच्या आत्याबाई ' हा विषयच असा आहे कीं, क्षणांत लेखणी सैल सुटेल तर क्षणांत भावना उचंबळून आल्या म्हणून भांबावून ती स्तब्ध होईल.

वास्तविक कुणी म्हणेल, आपल्या एखाद्या नातलगाबद्दल लिहितांना मन एवढं उचबळून यायचें कारण काय ? आईबापां-विषयींचं प्रेम एक वेळ समजूं शकतं. आजीला नातू आणि नात-वाला आजी प्रिय असावी हेंहि पटण्यासारखं आहे. पण या-खेरीज एखादा नातलग एवढा प्रिय असूं शकेल का ? मीं जर उलट म्हटलं कीं, " आमच्या आत्याबाईनीं आमच्याकरितां किती कष्ट काढले व आमच्यावर कशी माया केली हें तुम्हाला ठाऊक नाहीं म्हणून तुम्ही असं म्हणतां ! " तर तो यावर सांगेल कीं, " तुमचं हें म्हणणें मान्य करूनहि इतकं उचंबळून येण्यासारखा जिव्हाळा उत्पन्न कां व्हावा आणि तोहि सगळ्यांच्या मनांत, तें मात्र मला समजत नाहीं. स्वतःचं कांहीं न उरलेलीं माणसं, विशे-षतः स्त्रिया, दुसऱ्याच्या घरीं जन्मभर कष्ट करतात आणि कांहीं प्रमाणांत त्या सर्वांना हव्याशा असतात हें खरं, पण त्याचं

कारण त्यांचा कष्टाळू स्वभाव हेंच होय. त्यांना स्वतःचे कांहीं पाश उरलेले नसल्यामुळें, कुणाकरितां तरी राबावं आणि कुणावर तरी माया करीत राहावी हा त्यांचा स्वभाव बनतो. स्त्री असेल तर खासच! अशा स्त्रियांचीं उदाहरण आपल्या समाजांत हवीं तेवढीं सांपडतील. पण तुम्ही कांहीं तरी असामान्य, अलौकिक असल्याचें भासवतां तें कांहीं पटत नाहीं." यावर त्याला मी म्हणेन, "तुम्ही म्हणतां तें मी नाकारीत नाहीं. पण माझंहि म्हणणं सोडायला मी तयार नाहीं. त्याच कारण असं कीं तुम्ही म्हणतां तसं 'दुसऱ्याकरितां कष्टायच आणि दुसऱ्यावर प्रेम करण्यांत सुख मानायच' असं जिणं दुर्दैवान आमच्या आत्याबाईंच्या वांट्याला आलं असलं तरी त्यांच्या कर्तबगारीन आणि अलौकिक मनःसामर्थ्यानं त्यांनीं स्वतांकरितां जे स्थान आमच्या घरांत आणि त्याहिपेक्षां आमच्या अंतःकरणांत मिळवलं आहे तें अपूर्व आहे. आणि तें समजून घ्यायची इच्छा असली तर मी काय लिहितो तें तुम्हांला वाचलच पाहिजे. हें वाचून तुम्हांला जर अस दिसलं कीं, अशी एखादी व्यक्ति आपल्या आसपास देखील आहे, तर तिचा मोठेपणा ध्यानांत आल्यान देखील माझ्या लेखाचं सार्थक होईल. कारण दुसऱ्यावर मायेची संततधार धरणं हा अशा स्त्रियांचा स्वभावधर्मच असतो, पण अशा स्त्रियांची बूज राखणं स्वतःतच गुरफटलेल्या आपल्यासारख्यांच्या हातून सहसा घडत नाहीं. या लेखामुळें तें जर कुठं घडलं तरी देखील शाई आणि वेळ वांया गेला नाहीं असं मला वाटेल."

ऐकाच तर आमच्या आत्याबाईंची कहाणी. आत्याबाईंचा जन्म सत्तर वर्षांमागें मिरजेला झाला. आईवडील, चुलताचुलती, थोरलीं चुलत भावंडं म्हणजे नाना, अप्पा, तात्या यांच्यासह एकत्र कुटुंबांत त्यांचें बालपण गेलें. वडील केशवकाका सदा आजारी असत.

तिथेंच एका दुकानावर ते लिहिण्याचें काम करीत. त्यांचें व्यक्ति-चित्र 'गतगोष्टीं'त तात्यांनीं सुंदर रेखाटलें आहे.

येसुआत्याबाईंना चुलतीचा म्हणजे आमच्या आजीचा आणि चुलत भावंडांचा म्हणजे तात्या, अप्पा यांचा लळा फार. त्यांना ही गोरी, देखणी, नाजुक, चिमखडी फार आवडायची. तात्या एक लहानपणची आठवण अशी सांगतात कीं, एके दिवशीं ते शाळेंतून आले आणि छोट्या येसुबाईला कडेवर घेऊन फिरवूं लागले. त्यांच्या त्या वेळच्या पद्धतीच्या त्या लांब सदऱ्याच्या खिशांत पेन्सिल करायचा चाकू उघडा राहिला होता. तो येसु-बाईच्या मांडीला लागला व आंतून रक्त येऊं लागलें. येसुबाई रडूं लागली चाकू लागला म्हणून आणि तात्या रडूं लागले आपल्या हातून तिला लागलें म्हणून !

येसुबाई जशा घरीं प्रिय होत्या तशा शेजाऱ्यापाजाऱ्यांनाहि होत्या. किंबहुना कुणालाहि त्या आवडाव्या अशाच त्या लहान-पणापासून होत्या. पुढं दुर्दैवालासुद्धां त्यांच्या सुखाशीं खेळावंसं वाटलं हा भाग वेगळा ! पण आरंभ मात्र खरोखरच छान झाला होता. जवळच एक आठवले कुटुंब राहात असे. आठवल्यांच्या बायकोच्या मनांत ही मुलगी फार भरली. त्या बाईंनीं तिला सून म्हणून मागणी घातली. पांच वर्षांची ही मुलगी लग्न होऊन सासरी गेली व सासूच्या कडेवर बसून व दागिने घालून पाणवठ्यापासून देवळापर्यंत गांवांत सर्वत्र हिंडूं लागली.

आत्याबाईंचे सासरे विद्वान् दशग्रंथी ब्राह्मण होते आणि शिष्य तयार करण्याबद्दल त्यांचा मोठा लौकिक होता. हंगामाच्या सुरुवातीला ते थोडी सावकारीहि करीत. केळकर कुटुंबाचे व यांचें नुसतें नातेंच नव्हतें तर स्नेहहि होता. आणि कित्येक दिवस हीं दोन्हीं कुटुंबें एकाच वाड्यांत राहिलेली होतीं. माणसाच्या आयुष्यांतील

सुखाचा काळ लवकर संपतो. तसेंच आत्याबाईंच्या आयुष्यांत झालें. पतीची ओळख आणि पुत्रदर्शन या दोन्ही गोष्टी त्यांच्या आयुष्यांत श्रावणांतल्या सूर्यदर्शनाप्रमाणें आल्या आणि नाहींशा झाल्या. त्यांचा चटका जो काय त्यांच्या मनाला लागला असेल तेवढाच आठवण म्हणून राहिला. पण ती आठवण देखील त्यांची त्यांच्यापुरतीच. आत्याबाईंचे मोठेंपण हेंच कीं त्यांनीं आपल्या दुर्दैवाचा कोळसा कधींच कोणापुढें उगाळला नाहीं. त्याहि माणूसच आहेत, आणि त्यांनाहि केव्हां तरी मनस्ताप होत असणारच; आणि आता आम्हांलाहि केव्हां तरी त्याची चाहूल लागते. पण तेवढेंच ते. त्यांच्या मायेची ऊब लहानपणीं आम्हीं जशी अनुभवली तशीच आजहि आमचीं मुलें अनुभवीत आहेत. त्या येतील म्हणून त्यांची वाट पाहणं, तसंच त्यांच्या भोंवतीं भोंवतीं असणं, त्यांच्याजवळ झोपून गोष्ट ऐकण्याकरितां हट्ट धरणं व आपसांत भांडणं, तेंच तेच सगळं! आम्ही त्यांना आत्याबाई म्हणतों व आमचीं मुलं आजी म्हणतात एवढाच फरक. त्या आल्या कीं अविनाश त्यांना कडकडून भेटतो आणि धाकटी मुलं 'आजी आल्या, आजी आल्या' म्हणून टाळ्या पिटतात आणि हें माझ्या घरींच केवळ नव्हे तर थोड्याफार फरकानें आमच्या दहा घरांतहि घडतं.

प्लेगच्या रूपानं दुर्दैवानं डाव साधला; सासू गेली, नवरा गेला, आणि शेवटीं सासराहि गेला. हें मागच्या कुठल्या तरी जन्माच पापच म्हणायचं कारण दुसरं कुठलंहि बुद्धीला पटणारं कारण शोधूनहि सांपडत नाहीं. लादलेला सन्यास मस्तकीं घेऊन जवळ जवळ निर्धन स्थितींत त्या माहेरीं आल्या — बस्स! याहून अधिक या बाबतींत सांगण्यासारखं कांहींच नाहीं.

पण माणसाचं गेल्या जन्मींचं कांहीं तरी पुण्य असतंच.

येसूताईवर निस्सीम प्रेम करणारे रामकृष्णांसारखे दोन भाऊ, अप्पासाहेब आणि तात्या त्यांना लाभले होते. आत्याबाईंचीं सख्खी भावंडं सगळीं त्यांच्याहून लहान पण मोठ्या घरांत त्या सगळ्यांत लहान. चुलतीचं म्हणजे माझ्या आजीचं त्यांच्या वर सख्ख्या मुलीसारखं प्रेम, त्यामुळं त्यांनीं कुठं राहायचं हा प्रश्नच नव्हता. असं दुर्दैव अनेक स्त्रियांवर कोसळतं. त्या कुठें तरी आश्रयाला जातात, पुष्कळदां अप्रिय होतात, कांहीं वेळां त्यांच्या कष्टामुळं हव्याशा वाटतात, पण आत्याबाईंची कर्तबगारीच वेगळी. बुद्धि असून शिक्षण नाहीं, धन मिळालं पण लाभलं नाहीं, संसार मांडला पण मोडून गेला अशा स्थितींत एखादी बाई त्रागा करती, चिडखोर बनती, मन मारून घेऊन कसे तरी दिवस कठीत राहिली असती. पण आत्याबाईनीं मायेचा वेल लावला, त्याला कष्टाच खतपाणी घातलं आणि त्याचीं फळं भावांच्या मुलाबाळांनाच नव्हे तर आल्यागेल्यांना देखील देऊन त्यांना ऋणी करून ठेवलें. अप्पासाहेब आणि तात्या यांनीं त्यांच्यावर प्रेम केलं यांत नवल नाहीं, कारण त्या त्यांच्याच अंगाखांद्यावर वाढल्या होत्या. काकांना त्या जीव कीं प्राण वाटतात. कारण त्यांचे ते पाठचे भाऊच आहेत. भावजयांना त्या हव्याशा वाटल्या. कारण त्यांच्याकरितां त्यांनीं कष्ट सोसले असें म्हणतां येईल. आम्हां मुलांना त्या हव्याहव्याशा वाटतात याचं कारण, आम्हांला त्यांचा सहवास लहानपणापासून घडला हें असूं शकेल. पण नव्या पिढींतल्या सुनांना त्या अत्यंत आदरणीय वाटतात, त्यांची सेवा आपल्या हातून घडावी असं त्यांना वाटतं, त्यांना आपल्या घरीं ठेवून घेण्याबद्दल त्यांच्यांत अहमहमिका लागते, हाच आत्याबाईंच्या कर्तबगारीचा विजय आहे.

आत्याबाई आमच्या घरीं आल्या त्याला आज उणींपुरीं पन्नास

वर्षे झाली. आत्याबाई सांगतात, त्या वेळीं अप्पासाहेब नंदुरबार-ला होते, आणि वहिनींना थोरला बाबू झालेला नव्हता. माझ्या आठवणींत म्हणजे गेली सुमारें तीन तपे मी त्यांना जवळून पाहतों आहे. मला आठवते तेव्हांपासूनच आजी ' पुण्याच्या घरी ' जाऊन येऊन असायची. पण आत्याबाई मात्र नेहमीं जळ-गांवच्या घरींच असायच्या. त्यामुळें जशी आई आणि अप्पा-साहेब हीं दोन घरांतली वडील माणसें तशाच तिसऱ्या आत्या-बाई असेंच आम्ही मानीत आलों. आणि या समजुतीला धक्का लागावा असं अप्पासाहेबच काय पण आईदेखील कधीं बोलली वा वागली नाहीं. आईची शिस्त जरा कडक असे आणि त्यामुळें आईचा आत्याबाईच्यावर राग असे. तो हा कीं, त्या आम्हां मुलांचे फार लाड करतात. पण या रागाच्या आवरणाखालीं प्रच्छन्न कौतुकच दडलेलें असे, हे सांगायला कांहीं कुणी मनकवडा नको.

आम्ही सगळीं भावंडं एकापाठचीं एक असल्यानें सगळ्यांत लहान असत तीं साहजिकच आईजवळ आणि बाकीचीं उजाडल्या-पासून पुन्हा उजाडेपर्यंत, जेव्हां घरांत असत तेव्हां आत्याबाईच्या मागे मागे असत. आजी असली म्हणजे मी मात्र पुष्कळसा आजीजवळ असे. पण भाऊ, अक्का, बाबा यांचा आधार म्हणजे आत्याबाईच. भाऊ-अक्कांचं भांडण सोडवायला आत्याबाई लागत; अक्काला वाचतां वाचतां झोंप लागली म्हणजे, ' बायडीचं लक्षणच असलं ! ' असं रागानं पुटपुटत तिच्या डोक्यापासचा कंदील उचलायचा आत्याबाईनींच. बाबाची दुपारची झोंप झाली म्हणजे तो डोळे मिटल्या मिटल्याच ' गाडू पाणी ' मागायचा तो तयार ठेवून त्याला द्यायचा आत्याबाईनींच.

आत्याबाईच्या सहवासांत आम्हांला वैशाखस्नान, कार्तिकस्नान, माघस्नान माहीत झालं. लौकर उठावं, देवापाशीं दिवा लावावा,

देवापुढं रांगोळी घालावी हे सगळे संस्कार आत्याबाइच्या सहवासांत घडले. आत्याबाईनीं पहांटे उठावें, आम्हांला गोड भूपाळ्या ऐकवाव्या आणि मी मात्र अंथरुणांत पडून मस्तपणें पांघरुणांत गुरफटून घेऊन त्या ऐकाव्या. त्याच लयींत पुलावरून येणाऱ्या बैलगाड्यांची खडखड मिसळली कीं माझी जागृतींत तंद्री लागत असे.

अशीं पहिली बारा वर्षे गेलीं आणि मग जशी दत्तुकाकांना नोकरी लागली तशी आत्याबाई पण बऱ्याचशा पांचगणीला जाऊन राहूं लागल्या. येतांना पुण्यांत मुक्काम करूं लागल्या तरीसुद्धां त्या आमच्या घरीं आल्या म्हणजे चार सहा महिने सहज राहात. पण आतां त्यांच्या मुक्कामाच्या वांटण्या झाल्या होत्या. मग आम्ही म्हणूं लागलों, “ गव्हर्नरचा मुक्काम उन्हाळ्यांत पांचगणी, पावसाळ्यांत पुणें, आणि हिंवाळ्यांत खानदेशांत असतो. ” पण हा ‘ गव्हर्नर ’ कधीं रागावला नाहीं. आणि त्या रागावत नसत म्हणूनच आम्ही त्यांची थट्टा करीत होतों. आम्ही लहान म्हणून त्यांची थट्टा करतांना कधीं आम्हांला भीति वाटली नाहीं किंवा उलट त्यांच्याबद्दल आम्ही अनादरहि दाखविला नाही. मला वाटतं याच कारण एवढंच कीं, त्या अति मायाळू व गरीब म्हणूनच त्यांची आम्हांला भीति वाटत नव्हती. हें जसं खरं तसंच ज्या आई-अप्पासाहेबांचा आम्हांला वचक वाटे त्यांनींहि कधीं त्यांच्याबद्दल अनादर दाखविला नाही. आणि म्हणूनच आमचा मोकळेपणा कधीं मर्यादेबाहेर गेला नाहीं. आई अनेकदां म्हणायची, ‘ वन्स, तुम्ही मुलांना जरा रागवत जा ! ” म्हणजे आत्याबाई हंसायच्या आणि केव्हांतरी म्हणायच्या, “ अशानं वहिनी रागावतील हं ! ”

त्या जशा कधीं रागावल्या नाहींत तसंच कुणाचीहि वेळ त्यांनीं अडूं दिली नाहीं. जरी त्या अगदीं पांचगणीला जायला निघाल्या असल्या अन् तेवढ्यांत माईचं नागपुराहून पत्र आलं कीं ती अगदीं

टेकली आहे आणि घरांत कुणी नाहीं तर आत्याबाईंचा मोर्चा पांचगणीऐवजीं नागपूरकडे वळत असे. मी एकदां नागपूरला असतांना आत्याबाई अचानक आल्या; त्या येणार याची मला कांहींच कल्पना नव्हती. मी आश्चर्यानें विचारलं, "आत्याबाई, तुम्ही मध्येंच नागपूरला कशा?" त्यावर त्या म्हणाल्या, "या मायडीचं पत्र आलं! मग दामूला म्हणालें मला बसवून दे. होंडर–फर्मास (होल्डॉल–थर्मास) घेतला आणि निघाले." आणि मग त्यांच्यासकट आम्ही पोट धरून हंसलो.

मीं वर सांगितलच कीं, आम्हां बहीण-भावंडांना आत्याबाई प्रिय असल्यास नवल नाही; पण पुण्याच्या आणि जळगांवच्या दोन्ही घरच्या सुनांना त्या हव्या हव्याशा वाटतात, हेंच त्यांच्या मोठेपणाचं खरं गमक आहे. आणि त्याचं कारण प्रत्येकाच्या सुखदुःखाच्या वेळीं प्रत्येकाला त्यांचा आधार वाटला आहे. कोणाच्याहि घरांत कसलेहि कार्य असो, कुठलाहि मोठा कार्यक्रम असो, आत्याबाई आल्याशिवाय तयारीला सुरुवात होत नाहीं आणि सुरुवात झाली असली तरी रंग भरत नाहीं. आणि हें सगळं करून कुठलाहि मोठेपणा त्यांना नको आणि कसल्याहि खाण्यापिण्यांत त्यांचा जीव गुंतत नाहीं. कुणाच्या सुधारकपणाचा त्यांना राग नाहीं, तिटकारा नाही. पण म्हणून कांहीं त्या आपलं सोवळंओवळं सोडणार नाहींत. आपलें कळशीभर पाणी वेगळें ठेवतील, आपला भात वेगळा टाकतील, डावभर भाजी आणि वाटीभर आमटी बाजूला काढून घेऊन भांडीं तुमच्यापुढें सारतील, पण तुमची अडचण निवारण्याकरितां आल्याशिवाय राहणार नाहींत. तो त्यांचा स्वभावच नाहीं. त्या निर्लेप खातात आणि मनानं तुमच्या आनंदांत सहभागी होतात. पण याचा अर्थ त्या सर्वस्वीं सुखदुःखातीत आहेत असा नव्हे. त्या अगदीं मानवी आहेत. लहान

मुलांइतक्याच प्रेमळ आणि हळव्या आहेत. त्यांना अपमान समजतो आणि कुणीं जिवाभावानं केलेलं प्रेमहि उमगतं. त्यांना चांगल्या वस्तु आवडतात, देवाधर्माचीं नाटकंसुद्धां त्यांना कुणीं नेलं तर पाहायची त्यांची इच्छा असते, प्रवास करावासा वाटतो, कथाकीर्तनं ऐकावींशी वाटतात. त्या मनानंसुद्धां विटलेल्या किंवा उबगलेल्या नाहींत. तर चांगल्या समंजस रसिक आहेत. त्यांच्या-जवळ अहंकार नसला तरी स्वत्त्व आहे. आणि हें जे जाणतात त्यांच्याशीं त्या तितक्याच मोकळ्या मनानं वागतात.

पण त्यांचं स्वत्त्व त्यांच्यापुरतं असलं तरी त्यांचा मायाळु जीव मात्र सगळयांच्याकरितांच तुटतो. आणि मग कांहीं वेळां त्यांची असह्य ओढाताण पाहिली म्हणजे आपल्याहि पोटांत कालवतं. पुण्याच्या घरांत ताई आजारी होत्या. आणि जळगांवला अप्पासाहेब अंथरुणाला खिळलेले होते. त्या वेळची त्यांच्या मनाची ओढाताण मीं पाहिलेली आहे. त्या आमच्या घरांत असल्या, कुणाला बरं नसलं आणि त्याच वेळीं मुंबईला काकांच्या अरुणला ताप आला असं कळलं तर त्यांची स्थिति, 'मन लागत नाहीं आणि पाय निघत नाहीं,' अशी होते. या सगळ्या धांवपळीचं आणि कष्टाचं पुण्य चित्रगुप्त त्यांच्या खात्यावर काय मांडीत असेल माहीत नाहीं, पण आम्हांला मात्र त्यांच्या-बद्दल कृतज्ञता वाटते. त्या आपला फोटो कुणाला काढूं देत नाहींत. तरी देखील त्यांचा एक फोटो आम्हीं घेतलाच आहे— त्यांची ती लहानशी मूर्ति आमच्या मनांत सदैव घर करून राहिलेली आहे. त्यांच्यांत फारसा बदल झालेला आमच्या लक्षांत येत नाहीं, फक्त त्या अधिकाधिक थकत चाललेल्या दिसतात. त्यांच्या मनाची धडपड कायम आहे. आतां ती शरीराला झेपत मात्र नाहीं. आम्ही त्यांना विसांवा घ्या म्हणतों; त्या नुसतं 'हं'

म्हणतात. आणि हें अखेरपर्यंत असंच चालायच. आत्याबाई-च्याकडे पाहिलं आणि त्यांच्या गतायुष्याकडे नजर टाकली कीं माझ्या मनांत एक विचार येतो. कुणीतरी कवीन फुलांचा स्वभावधर्म सांगतांना म्हटलं आहे कीं, एक तर 'जनांचिया शिरीं' सजतील किंवा 'वनांत सुकून' जातील. पुष्कळ माणसं अशींच असतात. पण आत्याबाईच्यासारखं एखादं माणूस मात्र कुणाच्या शिरीं बसायचीहि हांव धरीत नाहीं किंवा कुणाच्या पायदळीं जाण्याइतकं स्वाभिमानशून्यहि असत नाही. तरीसुद्धां पण दुस-ऱ्यांच्या अंतःकरणांत स्थान मात्र कायमच मिळवून बसतं. पण असं माणूस एखादंच, हेंहि तितकंच खरं !

प्रसाद, दिवाळी अंक, १९५४





५

# विस्तारवेल

आधारवडाची कल्पना मला जितकी भव्योदात्त वाटते तितकीच विस्तारवेलाची कल्पनाहि हृद्य आणि मनोरम वाटते. पहिलीमध्यें माझ्या गत जीवनांतील आणि कुटुंबाच्या गतेतिहासांतील अनेक प्रसंग त्या भव्य वडाच्या पारंब्यांच्या रूपानें साकार झालेले दिसतात. तर नुकत्याच वाढीस लागलेल्या वेलाचीं तुरळक पानें आणि रेशमाच्या धाग्याप्रमाणें मृदु पण लांबसडक अंकुर पाहून 'उद्यांची' कल्पना माझ्या मनांत आकार धरूं लागते. आधारवडाच्या छायेखालीं विसावतांना जीव सुखावतो तर विस्तारवेलाची जपणूक करतांना मन हळुवार बनतं.

निजामानं नाना फडणिसांकडे एक मडकं पाठवलं आणि तें भरून अक्कल मागवली. एका महिन्याच्या अवधींत नानांनीं तें परत केलं आणि 'मडकं न फोडतां अक्कल सबंध काढून घ्या' असा निजामाला उलट निरोप पाठवला. नानांनीं तें मडकं एका

भोपळ्याच्या वेलाजवळ ठेवलं आणि एक छोटा भोपळा आंत सोडून महिनाभर मडक्यांत वाढूं दिला. मडक्याच्या तोंडांतून भोपळा बाहेर येणार नाहीं येवढा मोठा झाल्याबरोबर देंठ कापून मडक्यासकट भोपळा निजामाकडे पाठवला व बरोबरचा वरील निरोप सांगितला. त्या मडक्यांतला भोपळा मडकं न फोडतां निजामाला सबंधच्या सबंध काढतां आला किंवा नाहीं मला माहीत नाहीं; पण माझ्या विस्तारवेलाचं-अविनाशचं-संगोपन करतांना असे अवघड प्रश्न अनेक वेळां माझ्यापुढं उभे राहतात. कांहीं परिस्थितीनं आणि कांहीं त्याच्या विलक्षण कल्पकतेनं; आणि बालमन म्हणजे काय त्याची मला मग बरोबर कल्पना येते.

ज्याचं बालपण निष्काळजी स्थितींत गेलेलं असतं त्याचं मन लग्नापूर्वी आणि लग्नानंतरहि पहिले कांहीं दिवस कल्पनेच्या आकाशांत वाळूचे किल्ले बांधीत असतं. लहानपणीं बांधलेले वाळूचे किल्ले अजाणपणीं बांधलेले आणि निदान जमिनीला तरी टेंकलेले असतात. पण अल्लड तारुण्यांतले कल्पनारूपीं वाळूचे किल्ले तर त्रिशंकूप्रमाणें अधांतरींच लोंबकळत राहतात. एकदां कां लग्न होऊन सांसारिक जबाबदारीच्या दोऱ्यांनीं मनुष्य बांधला गेला कीं, मग माणसाला सहजीवनाचं खरं सुख कळतं. अर्थात् तें कळायला एक मूल होईपर्यंतचा अवधि मात्र ज्यूनियरच्या वर्षाप्रमाणं सुखानं जातो. निदान घरच्या सुखवस्तु मुलांच्या बाबतींत तरी असं घडतं. ‘ आतां तुमच तुम्ही बघा हं ’ असं पिताजींनीं स्वच्छ सांगितलेलं नसतं. मनावरचं ध्येयवादाचं वस्त्र विरलेल नसतं, व्यवहाराच्या जमिनीला पाय लागायचे असतात. पण त्यानंतर – थोडक्याच काळानंतर – वरील गोष्टी भूतकाळांत जमा होतात. आणि दोघांचीच नव्हे तर तिघांचीहि जबाबदारी अंगावर पडण्याची वेळ येऊन ठेपलेली असते.

पुत्रप्राप्तीचा आनंद अद्वितीय असतो असं मानलं जातं. मग कुणी हत्तीवरून साखर वांटो वा नुसती साखर वांटो. पण मला वाटतं, हा आनंद इतरेजनांनाच होत असावा. माझ्या एका स्नेह्यानें स्वानुभव सांगितला तो असा—एकोणिसाव्या वर्षी त्याचं लग्न झालं आणि बाविसाव्या वर्षी पितृपद प्राप्त होऊन त्याच्या सासऱ्यानं जेव्हां त्याचा मुलगा त्याच्या मांडीवर ठेवला तेव्हां तो लाजेनं नव्या नवरीपेक्षांहि लालीलाल होऊन गेला. त्या मित्रानं सांगितल्याप्रमाणें मी लाजेनं चूर जरी झालों नाहीं—कारण मी तिशीला आलों होतों—तरी माझ्या मनांत पुत्र-दर्शनानं प्रथम जी भावना उत्पन्न झाली ती आनंदापेक्षां संकोचाचीच अधिक होती. आणि माझ्या कल्पनेप्रमाणें आईचीदेखील पहिली भावना एका 'पणां'तून सुखरूप पार पडल्यामुळें 'सुटके'च्या आनंदाचीच असावी.

पण प्रथम जेव्हां दोन महिन्यांच्या चिमुरड्या अविनाशच्या संगतींत चार सहा दिवस राहून मी परत निघालों तेव्हांपासून एका वेगळ्याच विरहव्यथेची—रूढार्थामुळं शब्द कानाला जरा कसासाच लागतो—जाणीव होऊं लागली. आणि 'वात्सल्य, वात्सल्य' म्हणतात तें हेंच तर नसेल ना? असा प्रश्न मी माझ्या मनाला राहून राहून केला. गेल्या तीन वर्षांत या विस्तारवेलाचा पसारा खूपच वाढलेला आहे व त्याच्या धुमाऱ्यांनीं माझ्या व लताच्या जीवनाला कितीतरी वेढे बसले आहेत आणि रोज नवीन नवीन वेढे बसत आहेत. बालजीवनाचा रोज नवीन आविष्कार करणारे ते मृदु नाजुक बंध जितके सुखद आणि ऊबदार आहेत तितकेच उलगडायला अवघड आणि संभाळायला कठीण आहेत.

फूल कसं फुलतं आणि मूल कसं वाढतं, तें खरोखरीच

परमेश्वरालाच माहीत. मुलाच्या खस्ता आईबाप काढतात हें खर असलं तरी मूल मोठं झाल्यावर तें ऐलतीरावरून पैलतीराला कसं आलं त्याचं साग्रसंगीत स्मरण आईबापांना – निदान सगळ्याच – तरी असेल कीं नाही कोण जाणे! मला स्वतःचं जे बालपण कांहीसं तुटक आठवतं आणि त्यांत जे माझं मन तदाकार होतं त्यावरनं वाटे कीं, आईबाप जर आपल्या मुलांची दैनंदिनी ठेवतील तर ती केवढी मोठी गोष्ट होईल! बालमानसशास्त्राच्या अभ्यासकांना अगर वैद्यांना त्याचा उपयोग किती होईल मला माहीत नाही; पण खुद्द आईबापाना आणि नंतर मोठेपणीं त्या मुलालाहि ती दैनदिनी म्हणजे मोठा ठेवा वाटेल, यांत मला संशय वाटत नाहीं.

प्रत्येक सुशिक्षित कुटुंबांत आपल्या मुलाची अशी दैनंदिनी असावी आणि त्यांत मुलांच्या जन्मापासूनच्या महत्त्वाच्या घडामोडी अधूनमधून कां होईना लिहीत जाव्या अशी कल्पना माझ्या मनांत फार दिवसांपासून होती. मीं ती कांहींना बोलूनहि दाखविली होती. पण माझ्या माहितीपैकीं कांहीं कुणी ती अमलांत आणली नाहीं. आणि मी स्वतःदेखील जेव्हां ती अमलांत आणली तेव्हांदेखील माझ्या आळशी स्वभावाला अनुसरून नियमितपणें निदान दर आठवड्याला कांहीं ती लिहिली गेली नाहीं; पण मला मनापासून ती कल्पना आवडली होती आणि अविनाशच्या जन्माबरोबरच मीं या कामाला सुरुवातहि केली होती. म्हणूनच आज तीन वर्षांनीं त्या वहीचीं पानें मीं व माझ्या पत्नीनें मधून मधून लिहिलेली आढळतात. त्या पानांवर पुन्हा नजर फिरवली तरी दुहेरी आनंद होतो. गेल्या तीन वर्षांत अविनाशच्या सगतींत जे दिवस गेले त्यांची रम्य आठवण पुन्हा होते म्हणून एकपट आनंद होतो तर आपली कल्पना

खरोखरच उत्तम होती आणि म्हणूनच एका नव्या आनंदाचा पुनः पुन्हा प्रत्यय येऊं शकतो व पुढेंहि येत राहील. हें मनांत येऊन माझा आनंद दुणावतो.

अविनाशची रोजनिशी मी जेव्हां वाचतों तेव्हां असं वाटतं कीं, त्यांतल्या किती तरी गोष्टी त्या रोजनिशींत नोंदलेल्या नसत्या तर त्या कांहीं मला आठवल्या नसत्या आणि त्या रम्य प्रसंगांच्या पुनः होणाऱ्या आनंदाला मी मुकलों असतों.

वर लिहिल्याप्रमाणं मुलं कशीं वाढतात हें कांहीं कुणालाहि नीट खुलासेवार सांगतां येणार नाहीं. पण तें अनुभवायला मात्र येतं. अविनाशच्या जन्मापासून मला किती तरी दुखण्यांचीं नांवें माहीत झालीं. ज्याला आपल्या यातना बोलून दाखवितां येत नाहींत अशा लहानग्याला या सर्व दुःखभोगांतून जावं लागतं आणि हें सर्व आपल्याला घट्ट मन करून उघड्या डोळ्यांनीं पाहावं लागतं. पण याच कठोर अनुभवाबरोबरच तर जीवन म्हणजे काय आणि ताजेपणा म्हणजे काय याचाहि साक्षात्कार होतो.

तो दिवस मला आठवतो. सकाळपासून अविनाशला खोकल्याची उबळ येत होती. डॉक्टरनीं संथपणें सांगितलं कीं, 'पाहायला यायची कांहीं जरूर नाहीं. मीं दिलं आहे तेंच औषध द्या.' पण आम्हांला घरांत चैन पडेना. मी दुपारीं कामावर गेलों तो अस्वस्थ मनःस्थितींतच. माझ्या एका स्नेह्यानं विचारलं, 'तुम्हांला बरं नाहींसं दिसतं, मग आलांत कशाला आज?'

'मला कांहीं होत नाहीं पण अविनाशला बरं नाहीं' येवढंच मी विमनस्कपणें उत्तरलों. कांहीं वेळानें कामाकडेहि लक्ष लागेना. म्हणून घरीं परत आलों. घरीं तर आणखीच अवघड परिस्थिति माझी वाट पाहात होती. औषधांतल्या गुंगीच्या औषधानें तो

जवळजवळ निपचीत पडला होता. त्याची छाती वाजत होती. चार महिन्यांच्या जीवाच्या त्या यातना बघवतहि नव्हत्या आणि कांहीं उपचारहि सुचत नव्हते. शेवटीं निश्चयानं डॉक्टरचं औषध बाजूला सारलं आणि नात्यांतल्या एका वडील बाईंना बोलवून आणलं आणि मुलाची आई, मी आणि त्या बाई या तिघांच्या कमिटीला जे उपाय सुचले ते केले. अर्ध्या तासाच्या अवधींतच त्यानें डोळे उघडले आणि आमच्याकडे बघून तो हंसला. त्याला बरं वाटत होतं आणि त्यानं तें आम्हांला सांगितलं होतं. अंधारून आलेलं आभाळ मोकळं व्हावं तशी आमची मनोवृत्तीहि खुलली होती. आणि तशांतच सूर्यदर्शन व्हावं त्याप्रमाणं सकाळीं आजारी होता कीं नव्हता असं तिऱ्हाइताला वाटावं अशा रीतीनं अवी खेळत होता आणि हंसत होता.

निर्व्याज हास्याचा उल्लेख आपणांस अनेक ठिकाणीं आढळतो. पण निर्व्याज हास्य आपल्याला बालकाच्या ठिकाणींच आढळतें. सुख बोलकं करण्याकरितां किंवा मनांतलं दुःख अगर विचार लपविण्याकरितां बालक कधींच हंसणार नाहीं. त्याच्या वृत्तींत संकोच आणि दुटप्पीपणा अजून निर्माण व्हायचा असतो. ज्या वेळीं त्याच्या मनांत अपेक्षा निर्माण होईल, एखादी गरज उत्पन्न होईल, त्या वेळीं तें बालकाच्या राजमार्गाचाच आश्रय करील; मोठ्यानें रडून ती अपेक्षा व्यक्त करील. पण एरवीं अव्याजमनोहर स्मिताचे गुलाब त्याच्या गालावर तिन्ही त्रिकाळ, जागृतींत वा झोंपेंत, फुलतच राहतील. यावरनं सहज आठवण झाली. मी लिहीत बसलों होतों. बाहेरच्या बाजूस बोलत असलेल्या दोन पंधरा सोळा वर्षांच्या समवयस्क मैत्रिणींचें संभाषण मधून मधून कानांवर पडत होतें. त्यांत एकीनें एक प्रश्न दुसरीला विचारला, 'का ग, लहान मूल झोंपेंत कां हंसतं?'

हातांतलें लिखाण बाजूस सारून मी एका कागदावर हा प्रश्न लिहिला. आणि लगेच पुढें उत्तर लिहिलें, 'दिवसभर मोठीं माणसं किती मूर्खासारखं वागतात तें आठवून तें हंसतं!' ती थट्टा म्हणून सोडून देऊं पण अनेक वेळीं जेव्हां माझ्या मनांत मूल झोंपेंत खुदकन् कां हंसतं असा प्रश्न येतो त्या वेळीं गतजन्माची आठवण त्याला होऊन तें हंसत असावं असं उत्तर सुचतं. पण तेंहि मनाला पटत नाही. कारण त्याला कांहीं पुरावा आहे असं बुद्धि सांगत नाहीं. दुसरं असं कीं पूर्वीं जर त्याचा मनुष्यजन्मच असेल तर तो तरी इतका सुखी असेल कशावरून कीं ज्याच्या आठवणीनं माणसाला सुखच व्हावं. मानवी जीवनाची जी उलघाल आपण बघतों त्यावरून तरी असा धाडसी अंदाज करायला मन धजत नाहीं. पण तरी देखील जागेपणींच्या हास्यापेक्षां लहान बछड्याचं झोंपेतलं स्मित अधिक आकर्षक असतं, ही गोष्ट मला मनोमन पटली आहे.

अविनाशच्या सहवासांत हाच काय पण इतरहि आनंद मी किती तरी अनुभवले आहेत. कांहीं आयुष्य गेलं त्यांत सुखहि भोगलं आणि दुःखहि सोसलं. पुढें कसे दिवस जातील हें कोण सांगूं शकेल! पण भोगून संपले त्यांत हे जे सुखाचे क्षण मी व्यतीत केले आणि आनंदाचे कण गोळा केले त्याची स्मृति मात्र कायम राहील आणि येवढ्या सुखाबद्दल तरी मी विधात्याशीं कृतज्ञच राहीन.

अविनाशला माणूस ओळखायला लागून त्याच्या बाजूनें स्नेह-संबंध केव्हां निर्माण झाले तें मला नक्की आठवत नाहीं. पण थोडीशी पुसट आठवण आहे ती तो पांच महिन्यांचा असतांनाची. त्याच वेळेपासून तो ओळखूं लागला कीं नाना बाहेर जातात. त्यानंतरची पायरी म्हणजे त्याला चुकवून मी माझी मुंबईची फेरी करायला गेलों कीं जेमतेम एक दिवस तो घरांतल्या माणसांच्या भूलथापांना

मानीत असे. पण दुसऱ्या दिवशीं रात्रीं जर कां मी परतलों नाहीं तर कुलूप घातलेल्या माझ्या खोलीबाहेर बसून 'नाना दाखव' म्हणून आईपाशीं धरणें धरूं लागला. आणि तें रडणें मग झोंप लागल्यानंतरच थांबायचें. अर्थात् लवकर किंवा उशीरा, आपण परत आल्यानतर आणि त्याच्यापुढें खाऊचे खिसे रिकामे केल्यानतर मागचा सारा राग तो क्षणार्धांत विसरत असे. त्याच्या पुढची पायरी म्हणजे स्वतःच टांगा, आगगाडी व व्हिक्टोरिया इत्यादि सर्व साधनें कल्पनेनें निर्माण करून तो मुंबईस जाऊं येऊं लागला. पण नंतर या काल्पनिक प्रवासांत रममाण होण्याच्याहि मर्यादेपलीकडे तो गेला आणि मी मुंबईस जाणार आहे याचा थोडासा जरी सुगावा लागला तरी 'मलाच कुशुमताईकडे न्या, मलाच बाबुराव मोटारींत बछवीन, छायाकडे नेईन' वगैरे गोष्टी तो सांगूं लागला.

त्याच्या कुशुमताईकडे एक रेडिओकाका आहे. त्या रेडिओकाकाला एक मिनिटभर—बटन दाबून होईपर्यंत—हात जोडून नमस्कार केला कीं, तो बोलूं लागतो अशी त्याची कुशुमताईच्या बाबुरावांनीं ठाम समजूत करून दिली आहे. बाबुरावांच्या वशिल्यानें रेडिओकाका बोलूं लागतात आणि त्यांच्या मोटारीमध्येंहि बसायला मिळतें म्हणून तो अर्थातच त्यांच्यावर खुष असतो आणि आपले खास खेळ त्यांना करून दाखवितो.

त्याच्या खेळांत विविधता तरी किती प्रकारची आहे! तो अगदीं लहान वर्ष-सव्वा वर्षांचा असतांना त्याला मांजराचं विलक्षण वेड होतं. सबंध गोंवरानें फुललेला, अंगाची लाही होत होती आणि दिवसरात्र अलगद कडे-खांद्यांवर हिंडवून त्याला गप्प करावं लागत होतं. असाच एक दिवस मी त्याला घराच्या चौकांत हिंडवीत होतों. तो कण्हत होता. इतक्यांत गच्चीच्या कठड्यावर त्याला मांजर दिसलं. त्याबरोबर सगळं दुःख विसरून, एकदम हंसून त्यानं 'माऊ' म्हणून

हांक दिली. आमच्या तात्यांच्या घरीं मांजरी व्याली होती. तिचीं गोजिरवाणीं पिलं दोन हातांत दोन घेऊन तो बसत असे. कुठलाहि खेळ त्याला प्रिय वाटला नाही इतकं मांजर त्याला त्या वेळीं प्रिय होतं. कपड्याच्या हत्तीपेक्षां कपड्याचं मांजरच त्याला खेळायला आवडत असे.

त्यानतर तो थोडा मोटा झाला. आणि त्याला त्याच्या 'श्री दादाची' गोष्ट सांगितलेली आवडूं लागली. त्याला खांद्यावर थोपटत थोपटत मी सांगायचा, "बाळकाकाचा श्रीदादा विमानात बसून येणार आहे, मग तो अवीला घेऊन जळगांवला जाईल, मग मोठ्या आईला आणि 'अप्पाछायबां'ना घेऊन श्री-अवीच विमान भूर जाईल." एवढी गोष्ट रगवून सांगून होईपर्यंत हुंकार देत स्वारी झोंपी जायची.

मग जसजशी त्याची स्वारी हुंकाराच्या नादब्रह्मातून उच्चाराच्या शब्दब्रह्मांत प्रविष्ट होऊं लागली तसतशी गोष्टी ऐकण्यांतहि त्याची प्रगति होऊ लागली. मग तोच म्हणूं लागला, 'मला छुईची गोत्त सांगा! मोदकाची गोत्त सांगा!' सगळी गोष्ट संपली कीं मी म्हणायचा, 'आमची गोष्ट आंखूड, तुमच्या पाठींत लांकूड!' कीं तो लगेच मला अडवून म्हणे, 'नाही, आमची गोष्ट आंखूड आणि तुमच्या पाठींत लांकूड!' आणि या चिमुकल्या कोर्टाच्या असल्या निकालावर अर्थातच आमच्या घरांत अपील नाही.

कांही वेळां तो आमचा डाव तर आमच्यावर याहिपेक्षां सफाईनें उलटवायचा. एका रात्रीं तो रडत उठला. खिडकींतून चंद्र दिसत होता. त्याला चदू मामाच अतिशय वेड. त्याला गप्प करण्याकरितां मी म्हटलं, 'अवी, तो पाहिलास का चंदू? तूं गप्प राहून निजलास तर मी तुला सकाळीं आंब्याची वर्फी देणार आहे. आणि जर रडलास तर ती या चंदूला देऊन टाकीन.' या आमिषान तो गप्प झाला पण मला म्हणालाच, 'नाना, चदूला वर्फी खायला तोंड कुठं

आहे!' त्याच्या सद्‌ऱ्याचं बटन तुटलं होतं आणि दुसरं बटन सांपडत नव्हतं. पण खोलींतलं दिव्याचं बटन लावायला सांगून त्यानं आमची अडचण ताबडतोब दूर केली.

एकदां तो हट्ट आणि रडणं थांबवीना म्हणून त्याच्या आईनं त्याला गॅलरींत कोळशाच्या पोत्याजवळ नेऊन बसवलं आणि सांगितलं कीं, 'रडणं थांबलं म्हणजे घरांत ये!' कांहीं वेळानं डोळे पुसून दार उघडून तो आंत आला. पुढें चार दिवसांनीं त्याची आई गॅलरींत कोळसे काढून घेत होती. लगेच अवीनं खोलीचं दार लावून घेतलं आणि आई जेव्हां दार उघडून आंत येऊं लागली तेव्हां तो तिला म्हणाला, 'थांब, झालं कां तुझं रडून? आतां डोळे पूस आणि मग आंत ये!'

जरा चांगलं चालतां येऊं लागून जिन्याची चढउतार करायला यायला लागल्यावर स्वारी खाली जाऊन चार पानं ओरबाडून एका दुरडींत घालून भाजी विकूं लागली. घरांत येणाऱ्या भाजीवालीची नक्कल करून, तस्से हेल काढून तो भाजी विकूं लागला. केव्हां केव्हां तो भाजी शिजवूनहि घालूं लागला आणि द्रौपदीच्या थाळींतल्या एका पानानं जशी अनेकांची भूक भागली तशी अवीनं वाढलेली भाजी खाऊन आमच्या चाळींतली सगळीं माणसं तृप्तीची ढेकर देऊं लागली. पण थंड शेगडीवरून पेटलेल्या शेगडीवर भाजीचं भांडं ठेवण्याइतकी जेव्हां त्याची प्रगति झाली तेव्हां त्याचा तो नाद नाहींसा करतां करतां आमच्या नाकीं नऊ आले.

टांग्याला तो प्रथम 'का' कां म्हणत असे हें मला अजून कळत नाहीं. रस्त्यांत 'का' दिसला रे दिसला कीं, 'आपण का बढून जाऊं' हें गाणं सुरू व्हायचं. त्यावर उतारा म्हणून मीं एकदां म्हटलं, 'अवी, हा 'का' आपला नाहीं.' झालं. तेवढा शब्द त्याला पुरला. त्यानंतर केव्हांहि रस्त्यांत टांगा दिसला कीं, यानं 'हा का आप्पा

नाहीं ?' असं विचारायचं आणि त्या प्रत्येक प्रश्नाचं उत्तर सक्तीनं वसूल करून घ्यायच.

हल्लीं मात्र तो परस्पर टांगेवाले व बस कंडक्टर्स यांच्याशीं दोस्ती करतो आणि सर्व प्रश्नांचा भडिमार त्यांच्यावरच करतो. टांग्यांतून कुठेंहि जातांना याची जागा पुढें टांगेवाल्याजवळ असते. टांग्यांतून किंवा बसमधून उतरतांच 'अच्छा बस, बाय् बाय् बस !' असा निरोप द्यायला तो विसरत नाहीं आणि मग घरीं येतांच माझ्या शेजारीं कोचावर बसून चाबूक फटकारीत 'जलदी चलो रे घोडे' किंवा 'चली मोटार पम् पम्' असे तालासुरावर म्हणत तो मला त्याच्या माहितीच्या सर्व जगांतून हिंडवून आणतो.

विलक्षण पाठांतरशक्तीमुळं कुठेंहि एखाद्या गाण्याचा चरण ऐकला कीं, तो येईल तसा तो पाठ करतो. एक दिवस अंथरुणावर पडल्या पडल्या तो कांहीं तरी ठराविक कडवं गुणगुणत होता. मीं विचारलं, 'अवी, काय रे म्हणतो आहेस ?' त्यानं लगेच म्हणून दाखवलं,

'अखिया मिलाके जिया भर माके, चले नहि जाना – ओऽऽ
चले नहि जाना !'

मीं विचारलं, 'अविनाश, हें गाणं तुला कुणीं शिकवलं ?' तेव्हां मला कळलं, कीं शेजारच्या एका गड्याचं ऐकून त्यानं तें पाठ केलं होतं. या गाण्याचे बरोबर शब्द काय आहेत तें मला माहीत नाहींत आणि फार उशीरा सुचविलेली कुठलीहि दुरुस्ती अवी पत्करायला तयार नसतो. त्याच्या या धारणाशक्तीचा सदुपयोग करून घ्यावा म्हणून मराठी आणि संस्कृत सुभाषितें त्याला शिकवावयास सुरुवात केली आणि आज साडेतीन वर्षांच्या वयाला 'शुभं करोति' 'शांताकारं' इथपासून 'या कुंदेंदुतुषारहारधवला' इथपर्यंत पंधरावीस श्लोक त्यानं पाठ केले आहेत. या पाठांतराचा उपयोग श्लोकार्ध उलटे सुलटे करून किंवा त्यांत कांहीं तरी बदल करून म्हणण्यांत तो करतो. 'येरे

येरे पावसा 'ऐवजीं 'येरे येरे टांगा' असंहि गाणं तो रचतो आणि कुठं तरी अडला किंवा कांहीं आठवेनासं झालं म्हणजे 'पुढें काय?' म्हणून तो मलाच विचारतो.

एकदां आम्ही एका गायनसमाजावरून येत होतों. तिथ कांहीं तरी गाण्याचा सूर त्यान ऐकला. आणि मला थांबवून त्यानं एकदम विचारलं, 'नाना, पुढें काय?' हा येवढा तात्त्विक प्रश्न एकदम ऐकून मी भाम्बावलोच. मीं विचारलं, 'अवी, कशाच्या पुढं?' माझा प्रश्न त्यालाहि नीटसा कळला नाही. पण कांही वेळानं तो म्हणाला, 'ये चांद छुपना जाना!' मग माझ्या लक्षांत आल कीं, कुठला तरी सूर ऐकून त्याला ते गाणं आठवलं होत, पण सबंध म्हणता येत नव्हतं.

त्याचा कुठल्याहि खेळाचा नाद चार दिवसाहून अधिक टिकत नाही. पण त्यामुळंच त्याचे 'पुढें काय?' आणि 'म्हणजे काय?' हे तात्त्विक प्रश्न कधींच सपत नाहींत. टेबलावरच्या विजेच्या दिव्यावर तो मेणबत्ती पेटवूं लागतो आणि ती पेटली नाही म्हणजे ती कां पेटत नाही हें त्यास समजावून सांगतांना आपली मति कुंठित होते. कारण मग काडीनें सिगरेट कशी पेटते, हा त्याचा प्रश्न असतोच. लहानपणीं त्याच्या दुखण्यांनीं त्यान मला त्रस्त केलं आणि आज या प्रश्नांनीं तो मला जर्जर करीत आहे. पण त्याच्या सहवासांतच मला या कलहांतून— या संघर्षांतूनच जीवन कसं विकसित होत असतं तें अनुभवास आलं. महिन्याकांठीं शेंपन्नास रुपये मिळवणं हाच जर जीवनकलह असेल तर ज्यांच्याजवळ ते आधींच आहेत त्यांच्या जीवनांत कलहच नाहीं अस मानावं लागेल. त्याहून अधिक मिळविणं हाच जीवनकलह असेल तर त्याहूनहि अधिक ज्यांच्याजवळ आहे त्यांच्या जीवनांत कलह नाहीं असं म्हणावं लागेल पण ही धांवपळ म्हणजे जीवनकलह खासच नव्हे. प्राप्त परिस्थितींत जीवनाचा विकास हाच खरा जीवनकलह! धांवपळ म्हणजेच जीवनकलह मानणारे अनेकदां, 'जगत असलेलें'

जीवनच विसरतात. निदान माझ्या स्वतःवरून मला सांगतां येईल कीं, भूतकाळांत काय लाभलं नाहीं याची खंत करतांना आणि भविष्यकाळ कसा जाईल याची विवंचना करतांना वर्तमान-काळाचा अनेकदां विसर पडतो. अविनाशच्या सहवासांत वर्तमान-काळहि आनंदाचा आहे याची मला जाणीव होते. त्याच्याकरितां ज्या खस्ता खाल्ल्या आणि कष्ट सोसले ते सोसतांना आपल्याकरितां आपल्या आईवडिलांनीं सोसलेल्या कष्टांची जाणीव होते.

आधारवडाच्या आसऱ्याला आपण विसावतो तेव्हां या विस्तार-वेलाची जपणूक किती कृतज्ञतेनं, जिव्हाळ्यानं आणि दक्षतेनं केली पाहिजे हें मनांत येऊन थोडी काळजी वाटली तरी त्याच्या संगोपनांत केवढा आनंद सामावलेला आहे हें अनुभवानंच कळलेलं असल्यामुळें ती चिंता कुठल्याकुठें नाहीशी होऊन मन उल्हासान भरून येतं.

वाङ्मय-शोभा,
दिवाळी अंक, १९४६





६

# मोठ्या माणसासाठीं गोष्ट

आमचा अविनाश आज पाच वर्षांचा आहे. तो माझा मुलगाआहे म्हणून तर मला आवडतोच पण तो हुशार आहे, शाळेंत जातो, सगळयांशीं गोड बोलतो, श्लोक म्हणून दाखवतो म्हणून आमच्याकडे येणाऱ्या-जाणाऱ्यांना आणि शेजाऱ्यांनाहि तो आवडतो.

तो एकसारखे नाना प्रकारचे प्रश्न विचारतो म्हणूनहि लोकांना त्याच्या हुशारीचें कौतुक वाटतें. पण मला मात्र त्याच्या हुशारीचा कांहीं वेळां त्रास होतो. व मग मला त्याचा फार राग येतो.

पण मनांतून राग आला तरी मी सहसा त्याच्यावर रागावत मात्र नाहीं. शक्यतोंपर्यंत त्याला समजावून सांगून, नाहींतर दुसऱ्या एखाद्या विषयांत त्याचें मन गुंतवून मी त्याला गप्प बमवितों. पण नेहमींच हें जमतें असें नाहीं. कारण आपल्या बालबुद्धीनें आणि स्वतःला नकळत मला मात्र तो कोड्यांत टाकतो. मग माझा राग कुठल्याकुठें पळून जातो आणि माझं मलाच हंसूं येऊं लागते.

वेळीं अवेळीं एकसारखे प्रश्न विचारून मला भंडावून सोडण्याची संवय अविनाशला लहानपणापासूनच आहे. त्याची कटकट जरा कमी व्हावी, निदान दुपारची दोन तास विश्रांति मिळावी म्हणून आम्ही त्याला 'शिशुसदन' मध्यें घातला. पण मग सुट्टीच्या दिवशींच तो घर डोक्यावर घेऊं लागला आणि त्याला आठवड्यांतून शनिवार-रविवार या नेहमीच्या दोन व इतर एखादी मिळून तीन सुट्ट्या असतातच.

पुढें मात्र त्यानें हळूंहळूं आपले सवंगडी जमवावयास सुरुवात केली. प्रथम प्रथम तो मित्र घरींच आणीत असे. पुढें तो मित्रमैत्रिणींकडे जाऊं लागला. आमच्या समोरची नीला त्याची आवडती मैत्रिण. नीलाला तर अवि आवडतोच पण तिच्या घरच्या इतर माणसांना व तिच्या भावंडांना पण तो हवाहवासा वाटतो. आरंभीं आरंभीं तो खेळायला बाहेर जाऊं लागला तेव्हां मला स्वस्थपणा मिळतो म्हणून मला तें बरें वाटलें. पण पुढें माझ्या लक्षांत आले कीं, सुट्टीच्या दिवशीं हातांवर पाणी पडायचा अवकाश, तो नीलाकडे पळतो. तेव्हां मी एक दिवस त्याला म्हटलें, "अवि, अरे दुपारी लोकांची विश्रांति घ्यायची वेळ असते, तेव्हां खेळायला जाऊन लोकांकडे दंगा करूं नये." त्यावर तो म्हणतो, "पण नाना त्यांच्याकडे कुणाला त्रास होत नाहीं. आम्ही किती दंगा केला तरी नीलाची आई किंवा भाऊ रागवत नाहींत. मग जाऊं मी खेळायला?"

मग माझ्या मनांत आलें कीं थोडा विषय बदलावा आणि अवीला पण थोडें शहाणपण शिकवावें. लोक बोलत नाहीत हें खरं पण आपण तरी त्यांच्या गरीब स्वभावाचा फायदा किती घ्यावा! म्हणून मी अवीला म्हटलें, "अविनाश, हल्लीं पुष्कळ दिवसांत मी तुला श्लोक शिकवला नाही. चल मी आज तुला

नवीन श्लोक शिकवतों." तोहि मोठ्या नाखुशीनें पण मुकाट्यानें माझ्यासमोर येऊन उभा राहिला.

"अतिपरिचयात अवज्ञा संतत गमनात् अनादरो भवति ।
मलये भिल्ल पुरंध्री, चंदन तरुकाष्ठमिंधनं कुरुते ॥"

मी प्रथम त्याला हा सगळा श्लोक सावकाश म्हणून दाखवला आणि मग दोन वेळां त्याच्याकडून थोडा थोडा सांगून म्हणून घेतला. दोन वेळां श्लोक म्हणून झाल्यावर त्यानें विचारलें,

"नाना, जाऊं मी आतां नीलाकडे ?" मी म्हटलें, "अविनाश, अजून श्लोकाचा अर्थ सांगायचा राहिला आहे."

"बरं सांगा" तो म्हणाला.

"हें बघ," मी सांगूं लागलो, "कुणाशीं फार मैत्री केली तर एखादे वेळेला लोकांना आपण आवडेनासे होतों. कुणाकडे एकसारखें आपणच जात राहिलों तर लोक आपला तिटकारा करतात. आणि हें नीट लक्षांत यावं म्हणून श्लोकांतच एक उदाहरण दिलं आहे, बरं कां अवी. आपण चंदनाचं देवाला गंध लावतो ना उगाळून, त्या चंदनाचीं मलयपर्वतावर जंगलं आहेत म्हणून तिथें जंगलांत राहणारी भिल्लीण चंदनाचीं लांकडंच जाळून चुलींत टाकते. तसंच आपण जर लोकांशीं फार सलगी केली तर लोकांनाहि आपली किमत वाटत नाही."

श्लोकाचा अर्थ सांगायला सुरुवात करतांच माझ्या लक्षांत आलें कीं, अविनाशच्या बुद्धीला झेंपण्याइतका श्लोक सोपा नाहीं. पण मी सुरुवात केलीच होती म्हणून अर्थ पुरा सांगून टाकला एवढेंच. आणि मला वाटलें कीं अर्थ सांगून होतांच अविनाश 'खेळायला जाऊं कां' म्हणून विचारील आणि मी त्याला 'जा' म्हणून सांगेन. पण आतां त्याच्यांतला वकील जागा झाला होता. मी अजून वकिलीची डिग्रीदेखील घरांत आणलेली नाहीं, पण अविनाशच्या अंगांत वकील कुठून संचारतो कुणास ठाऊक !

त्यानें मग आपल्या प्रश्नांची फैर सुरू केली. " नाना अति परिचय म्हणजे काय हो ? अवज्ञा म्हणजे काय हो ? "

" अरे, मी सांगितला ना मघाशीं सगळ्या श्लोकाचा अर्थ ! "

" मला तसा नको. वेगवेगळा अर्थ सांगा ! "

' आतां आली कां पंचाईत ' मी मनांत म्हटलें.

" नाना मलयपर्वत कोठें आहे हो ? " त्यानें माऱ्याचें ठिकाण बदललें.

" खूऽऽप, खूऽऽप लांब आहे " मी म्हणालों.

' हज्जार मैल लांब आहे ? मग आपल्याला तिथं जातां यायचं नाही ? मग आपण विमानांतून जाऊं ! मग चलाल ? केव्हा चलाल ? दिवाळींत चलाल ? "

" अरे अविनाश, आपण जाऊं. पण पुढें केव्हांतरी तूं मोठा झाल्यावर जाऊं ! "

" मोठा झाल्यावर कां ? सिंहगडावर नाहीं का माणसाच्या डोक्यावर बसून चढलों तेव्हां ? तसाच मलयगिरीवर पण चढेन ! पण ... नको, शुभी थोडी मोठी होऊं दे मगच जाऊं ! "

" मला वाटलं सुटलों मी एकदांचा. पण छे ! तेवढ्यात पुढचा प्रश्न कानांवर आदळलाच.

" पण नाना, मलयगिरी पर्वतीएवढा आहे कीं सिंहगडाएवढा आहे ? पर्वतीएवढा असला तर मी पायींच चढेन ! "

" नाहीं रे अविनाश, तो सिंहगडापेक्षा खूप उंच – हिमालया-एवढा आहे ! " मी म्हणालों-

" मग नाना, तिथं वाघ, सिंह असतील ? "

आतां मात्र मला मनांतून स्वतःचाच राग येऊं लागला होता. कारण हें संकट माझें मीच ओढवून घेतलें होतें. मी विचार करूं लागलों, ' आतां मला यांतून कोण सोडवील ? ' एवढ्यांत

समोरच्या गॅलरींत हंसरी नीला दिसली. आणि पाठोपाठ तिची हांक आली–'अऽवी!' अवी म्हणाला, 'नीऽला!' नीला म्हणाली, "खेळायला येतोस?" अवि म्हणाला, "नाना, मी नीलाकडं जाऊं?" मी म्हटलें, "जा–पळ–पण मोठा आरडा-ओरडा करून आईला–भाऊंना त्रास देऊं नका हं?" पण अवि उत्तर द्यायला थांबलाच नाहीं. तो माझ्या समोरून पळाला आणि एका मिनिटानेंच तो समोरच्या गॅलरींत नीलाला सांगत होता, "ए नीला, दिवाळींत आमची शुभी मोठी होईल–मग आम्ही विमानानें मलयगिरीवर चंदन आणायला जाणार आहोंत. तू येशील?" मान कलती करीत नीला हंसत म्हणाली, "हो" आणि मग उड्या मारीत, टाळ्या पिटीत, कांहींतरी बडबडत तीं दोघंहि मोठमोठ्यानें हंसूं लागलीं. हंसत हंसत मीहि हातांतलें पुस्तक वाचूं लागलो.

केसरी,
२१ नोव्हेंबर १९५४





# ७

# त्रिदळ

शुभी आज त्रिचूरला जात आहे. पुण्यापासून खूप दूर – सुमारें हजार मैलांवर, कोचीनच्या थोडें अलीकडे त्रिचूर आहे. त्रिचूरला शुभीचें आजोळ आहे. चार दिवसांपूर्वी तिला जेव्हां कळलें कीं, तिची माईमावशी त्रिचूरला जाणार आहे, तेव्हांपासून ती 'त्रिचूरला जायचं' म्हणून नाचत होती. आणि मावशीनें जेव्हां 'तिला स्टेशनवर पोंचवा, मी तिला बरोबर नेतें' असें कळवलें, तेव्हां तिचा आनंद ओसडूं लागला. ज्याला त्याला ती त्रिचूरच्या गमती आणि तिथें आपले कसें लाड होणार तें सांगूं लागली. आज पहांटे चारलाच ती जागी झाली आणि 'आतां मी निजतच नाहीं, कारण आतां उजाडेलच आणि मग मला प्रवासाची तयारी करावयाची आहे' असें म्हणूं लागली. तिनें हरप्रकारची तयारी केली आहे. कपडे, खाऊ, पुस्तकें, विणायचें सामान आणि एक ना दोन! आणि दुपारीं गाडींत बसल्याबरोबर ती विणकाम काढून

बसली. तिला कोणींसें म्हटलें, 'अग शुभे, गाडी सुटेपर्यंत तरी आमच्याशीं बोल कीं,' तेव्हां किंचित् लाजून ती म्हणते, 'मी फक्त गुंता सोडवत होतें!'

गाडी सुटायच्या आधीं मी तिला उपदेश करीत होतों. आणि ती हंसून व मान वेळावून प्रत्येक गोष्टीला होकार देत होती. मला हे माहीत आहे कीं, मीं सांगितलेल्या सगळ्या गोष्टी ती विसरणार आहे आणि प्रवासांत कमल तिची जास्तींत जास्त काळजी घेईल. आणि त्रिचूरला तर खुद्द तिचे आजी–आजोबाच आहेत. ज्यांनीं तिच्या आईला लहानाची मोठी केली त्यांना तिला सांभाळतां येणार नाही का? पण पोरांविषयींची माया मोठी विचित्र असते. आणि दोन वर्षांपूर्वी ती दिवाळींत भाजल्यापासून तर मी तिच्या बाबतींत फारच हळवा झालो आहें. तिच्या वावसटपणाची मला फारच भीति वाटते. मी तिला एखाद्या मोठ्या माणसाला समजावून सांगतात तसें मुद्देसूद रीतीनें अनेक गोष्टी सांगत होतों आणि अजून सुदैवानें ती मला तोडून न टाकतां अगदीं लाघवीपणानें प्रत्येक वेळीं 'ऐकेन' असें पुन्हा पुन्हा कबूल करीत होती. गाडीची शिटी झाली तशी तिला मीं क्षणमात्र जवळ घेतली, तिच्या तोंडावरून हात फिरविला आणि 'अच्छा' म्हणून तिचा निरोप घेतला.

गाडी सुटली, दृष्टीच्या टप्प्याबाहेर गेली आणि आम्ही परत फिरलों. पण आज गंमत झाली. इतका हळवा असणारा मी मजेंत होतों. पण तिची आई मात्र अस्वस्थ दिसत होती. घरांत आल्यावरहि शुभीचा दंगा जाणवेना म्हणून ती बेचैन होती. आणि धाकटा श्रीकरहि रात्रीं, कंटाळा आला म्हणून न जेवतां दूध पिऊनच झोंपीं गेला. अविनाश–श्रीकरच्यामध्यें झोंपणारी आणि दोघांशींहि पटाईतपणें भांडणारी शुभी आज घरीं नव्हती

म्हणून त्यांनाहि चैन पडत नव्हतें.

शुभदा अतिशय भांडखोर आहे. लहानपणीं ती अतिशय आक्रस्ताळी होती. रात्रीं अपरात्रीं ती उठून रडत बसे. कशानेंहि राहात नसे. आणि तिच्या पाठीवर फक्त सव्वा वर्षानें झालेला श्रीकर आईजवळ असल्यानें शुभीला खांद्यावर टाकून, रागावून, गोड बोलून शांत करण्याची कामगिरी माझ्याकडे असे. दिवसभर खेळणारी ही मुलगी रात्रीं पिसाटासारखी कां ओरडते याचें शेजाऱ्यापाजाऱ्यांनाहि कोडें असें. शुभी तीनचार वर्षांची झाली आणि तिचें रडणें कमी होऊन मोठ्यानें हंसणें, जोरानें भांडणें आणि गल्लीभर बागडणें हा क्रम सुरू झाला. आमचे कांही मित्र तर शुभाशी हमखास भांडण उकरून काढतात व ती सगळ्यांना पुरून उरते.

नुकतेंच नवरात्र सरलें आहे. या नवरात्रांत शुभीच्या उत्साहानें हद्द गांठली. भोंडल्याच्या निमित्तानें रोज कितीतरी मुली ती गोळा करून आणी आणि उलट आपणहि तितक्या घरीं जाऊन भोंडला खेळून यायची. इतकें हुंदडल्यावर केव्हांतरी रात्रीं पाय दुखतातच. मग केविलवाण्या आवाजांत 'नाना, पाय दुखतात हो,' म्हणायची. 'मग इतकी धांवलीस कशाला?' असें जरी मीं म्हटलें तरी पाय चेपून मिळतात ही तिची खात्री आहे. त्यांतूनहि गरज लागलीच तर हुकमी रडणें तिच्या हातच आहे.

शुभी इतकी भांडखोर असली तरी तिच्या मैत्रिणींचा परिवार फार मोठा आहे. शिवाय तिच्या चाहत्यांत कॉलेजच्या मैदानावरचा भैय्या, तिथें कांहीं कामानिमित्त येणारे पोलीस, फिरायला येणारीं जोडपीं—तींहि सर्व वयांचीं—असा समाज असतो. मैत्रिणींशीं ती कितीहि भांडली तरी मैत्रिणींची संख्या कमी होण्याऐवजीं वाढतेच आहे. हंसरा चेहरा, गोड बोलणं आणि चेहऱ्यावरचा

आर्जवी भाव या भांडवलावर तूर्त तरी ती सगळीकडे वजन ठेवून आहे. परवां भोंडल्याचेंच पाहा ना ! भोंडल्याची भातुकली होती तर शुभानें आपल्या बरोबरीच्याच नव्हेत तर आपल्याहून मोठ्या अशासुद्धां मैत्रिणी गोळा करून आणल्या होत्या. मग आधीं त्यांचे खेळ व फराळ झाल्यावर मला मुद्दाम बोलावून गीतें, नृत्यगीतें, अभिनयगीतें, इत्यादींची माझ्यासमोर हजेरी झाली. आणि हें कांही शुभीचें एका दिवसाचें कर्तृत्व नाहीं. रोम कधींच एक दिवसांत बांधून होत नाहीं. तीनचार वर्षों-पूर्वीची गोष्ट मला आठवते आहे. त्या वेळीं शुभदा अवघी चार वर्षांची होती. असेच भोंडल्याचें दिवस. संध्याकाळीं साडेसातचा सुमार असेल. दुकानें बंद होतील आणि मला एक औषध हवें होतें, तें आणायचें राहील म्हणून मी घाईघाईनें घरांतून निघालों. पुष्कळ अंधार झाला होता; इतक्यांत एक लहान मुलगी समोरून पळत येतांना दिसली. ‘इतक्या संध्याकाळीं ही कोण मुलगी घराबाहेर ? आणि कुठें चुकली तर ? आईबाप बघत कसे नाहीत ?’ असें मनांत आल्यामुळें मी पुढें होऊन तिला अड-वलें. तिनें मुळीं मी कांहीं विचारायच्या आंतच माझे हात पकडून हंसायला सुरुवात केली. पाहतो तर ती शुभीच ! तेव्हां मी रागानें म्हणालो, ‘शुभे, रात्रीची कुठं भटकतेस ?’ त्यावर ती अगदीं निरागसपणें मला म्हणते, ‘अहो नाना, मी भोंडल्याला गेलें होतें. पण आतां तुम्ही कुठें चाललांत ?’ ‘मी चाललों आहें औषध आणायला वसंत कंपनींत.’

‘मग चला, मी पण येतें तुमच्याबरोबर !’ आणि माझ्या हाताला धरून ती चालायला लागली. मी हा विचार केला कीं तिला बरोबरच घेऊन घरीं जाऊं. औषध घेऊन आम्ही परत आमच्या गल्लीपाशीं आलों तों जवळच कुठें तरी ते सुप-

रिचित ' ऐलोमा पैलोमा गणेशदेवा ' हे शब्द आणि फेर धर-ल्याचा आवाज कानांवर आला. त्याबरोबर माझा हात सोडून, खुणेचा शब्द ऐकल्यासारखी शुभी म्हणते, ' नाना, अजून एक भोंडला राहिला आहे बरं कां ! मी आंत जाऊन येतें. ' मी तिला हांक मारून म्हणतों, ' अग पण शुभे, आतां रात्र झाली ना ? घरीं कशी येशील ? ' त्यावर त्या घरांत शिरत शिरत ती हंसून म्हणते, ' अहो, माझं घर मला माहीत आहे. ' भीति हा शब्दच तिच्या गांवीं नव्हता.

आणि तिच्यांत आजीबाईपणा तर इतका विलक्षण आहे कीं, तिचं बोलणं एक एक ऐकत राहावें आणि कृति पाहात राहावी. हल्लीं निरनिराळ्या मासिकांतून ' किलबिल ', ' चिमखडे बोल ' वगैरे सदरें मुलांचें वाक्पाटव दाखविण्याकरितां चालू असतात. त्यांतला मजकूर वाचतां वाचतां केव्हां केव्हां मनांत येतें—अंक आणि रुपयाच्या लोभानें आईबाप आपलें वाक्पाटव मुलांच्या नांवानें छापून आणवीत नसतील ना ? पण आमच्या मुलांच्या अनुभवा-वरून सांगतों कीं ज्या तऱ्हेचें वातावरण मुलाच्याभोंवतीं असतें त्यांतली भाषा तीं नकळत उचलतातच. तीं विशेष बुद्धिमान असलीं तर अवलोकनानें मिळविलेल्या ज्ञानाचा स्वतंत्रपणें उपयोगहि तीं करतात. श्रीकर तसा शुभीहून फक्त सव्वा वर्षानें लहान ! पण ही आधीं जन्माच्या हक्कानें ताई झालेली आणि आपल्या लहरीप्रमाणें ती आपलें ' ताईपण ' गाजवते देखील. भोंडल्याच्या गाण्यांत अशा कांहीं ओळी आहेत :

**... चिलार बाळाला भूक लागली ।**
**सोन्याच्या वाटीनें दूध पाजलें ।**
**निजरे निजरे चिलार बाळा ......** वगैरे.

येईल तें गाणें ठसक्यांत म्हणून ती रडणाऱ्या श्रीकरची

समजूतसुद्धां करायची. पण हें सगळें प्रौढपण नेहमींच टिकतें असं नाहीं. खाऊच्या वांटणीचा प्रश्न निघाला किंवा मैत्रिणींच्या घोळक्यांत रमतांना श्रीकरची अडचण वाटायला लागली म्हणजे ती प्रौढपणाचें सोंग टाकून देते व आपल्या वयाला साजेलसा अवतार धारण करते.

पण श्रीकर झाला तरी तिचाच भाऊ! तोहि सगळ्यांत लहान असल्याचा सोईस्कर फायदा घेतो. आणि शुभी भांडायला लागली तर प्रसंगीं तिच्यावर मातहि करतो. कारण बोलून चालून तो मुलगा आहे. शुभी ज्याप्रमाणें अनेकदां आपल्या मोठेपणाचें भांडवल करते, त्याचप्रमाणें श्रीकर आपण सगळ्यांत लहान आहोंत याच गुणाचें भांडवल करतो. आरभीं आरंभीं तिला श्रीकरच्या लहानपणाचा हेवा वाटे. तो लहान म्हणून त्याचें जास्त कौतुक होतें असें वाटून ती आपला हक्काचा वांटा वसूल करायला टपलेली असे. मीं त्याला कडेवर घेतला रे घेतला कीं लहानपणीं शुभी पुढें येऊन, हात वर करून 'दोघाना घ्याव्' असें म्हणत उभी राहायची. पुढें ती मोठी झाल्यावर 'तूं बाबूची – श्रीकरला आम्ही बाबूहि म्हणतों—ताई ना?' असें म्हणून आम्ही तिला हरबऱ्याच्या झाडावर चढवूं लागलों. तेव्हां तीहि स्वतःच 'बाबुल्या माझा' म्हणून त्याचें कौतुक करून त्याला खेळवूं लागली. शुभी लहान असतांना अविनाश असेंच तिला 'बेबुडी, चंपुडी, झंपुडी' म्हणत असे. मला वाटतें कीं मूल लहान असलें तरी, आपल्याहून लहान मूल दिसतांच त्याची वात्सल्य–भावना जागृत होते. पुढें तीं दोघेहि मोठीं होत गेलीं तसं त्यांच्यांतील वयाचें अंतर व्यवहाराच्या दृष्टीनें लुप्त होत चाललें. आतां त्यांच्यांतील संवाद बरोबरीच्या नात्यानें चालतात. आणि शुभीनें त्याला बाजूस सारून मैत्रिणी गोळा केल्या तर तोहि आपले मित्र जमवून कॅरमचा डाव मांडतो.

प्रथम प्रथम शुभी त्याला चुकवून पळाली तर तो तिला बोलावून आणी. ' मी तिच्याशीं भांडणार नाही ' वगैरे बोल्या करावयाचा. पण तो आतां आपला स्वतंत्र मार्ग आंखतो. दिवस भर दोघांचे जे प्रेमसंवाद व खटके चाललेले असतात ते ऐकण्यासारखे असतात. एकदां शेजारच्या बाईंना नवें बाळ झालें. ते पाहून आल्यावर दोघांनीं आईला विचारलें, ' शेजारच्या मावशींनीं दवाखान्यांतून किती सुंदर बाळ आणलं आहे. आई; तू कां ग नाही असे एक बाळ दवाखान्यांतून आणत ? ' त्यावर आई म्हणाली, ' आपल्या घरीं कशाला हवं आहे बाळ ? हा आहे कीं माझा छकुला ! ' असें म्हणून तिनें श्रीकरला जवळ घेतलं. त्यावर त्याचें समाधान झालें व तो एकदम खुष होऊन आईच्या मांडीवर लहान बाळाप्रमाणें आडवा झाला. पण शुभीचें समाधान होईना. तेव्हां आई तिला म्हणाली, ' अग शुभे, डॉक्टरीणबाई बाळ मागितलं तरी देत नाहीत ! ' तेव्हां शुभी ठसक्यान म्हणते, ' हो, न द्यायला काय झालं ? आणि ही डॉक्टरीण देत नाहीं तर दुसऱ्या डॉक्टरीणबाईकडे जा ! '

एकदां बाबूची पेन्सिल हरवली आणि ती त्याला पुन्हा चड्डीच्या खिशांतच सांपडली. तेव्हां तो शुभीला सांगत होता, ' शुभे, माझं किनई, कांखेला कळसा गांवाला वळसा, म्हणतात ना, तसं झालं. ही बघ पेन्सिल माझ्या खिशांत आणि मी सगळीकडे शोधतोय् ! ' त्यांचे असे सवाद ऐकले म्हणजे मला शिक्षणाचा दर्जा वाढला कां आपलीच मुलें हुशार आहेत असा प्रश्न पडतो. एके दिवशीं तर दोघांनीं कमाल केली. रात्रीं दोघे माझ्या दोन बाजूंना निजलीं होतीं आणि मी त्यांना ध्रुवाची गोष्ट सांगतांना कांहीं चूक झाली. लगेच शुभीनें मला हटकलें आणि म्हणाली, ' बाईंनीं असं नाहीं सांगितलं ! ' त्यावर मी तिला

म्हटलें, 'अग, जा ग, तुझ्या बाईंना काय कळतंय्!' तेव्हां 'काय, बाईंना कळत नाहीं?' असा प्रश्न विचारून आणि 'केवढें हें आपल्या वडिलांचें अज्ञान' असा भाव चेहऱ्यावर आणून ती खदखदा हंसूं लागली. क्षणभर मीहि स्तिमित झालों. तेवढ्यांत माझ्या दुसऱ्या बाजूनें डोकें वर करून श्रीकर तिला म्हणतो, 'शुभे, नानांना तुझ्या बाईपेक्षां जास्त कळतं बरं कां! ते तर संपादक आहेत.' आतां गप्प बसायची पाळी शुभीची होती. या सगळ्या वाक्‌पटुत्वानें आमची मात्र भरपूर करमणूक होते. किंबहुना दिवसभराच्या साऱ्या कष्टांचें परिमार्जन झाल्या-सारखें वाटतें. आणि त्यांच्या निरागस बाललीलांचा आनंद नेहमीं चाखायला मिळावा असें वाटतें.

पण कालगति कोणाचेंच ऐकत नाहीं. आम्ही असेच लहान होतो आणि आईबापांच्या छायेंत एकमेकांना बिलगून भांडत, तंडत आणि प्रेमहि करत वाढलों, मोठे झालों आणि पांगलों. आमचे स्वभाव भिन्न आहेत, व्यवसाय भिन्न आहेत, आर्थिक परिस्थिति भिन्न आहे आणि आयुष्यांतील प्रत्येकाच्या जोडीदाराचा स्वभाव आणखी भिन्न आहे. पण तरीदेखील आम्ही एका छत्राखालीं वाढलों हें कळत न-कळत आमच्या मनांवर बिंबलें आहे. त्या सांवलीची ऊब अजूनहि आम्हांला आठवतें. आणि म्हणूनच आम्ही एकमेकांना केव्हांहि हक्कानें हांक मारतो.

आमच्या श्रीकरलाहि आतां केव्हां केव्हां एकदम मोठे व्हायची हुक्की येते. त्याला अजूनहि आईवांचून क्षणभरहि चैन पडत नाहीं; तरीपण दादाची एखादी जुनी विजार सांपडली कीं, 'मला आतां पट्ट्याची विजार हवी, बंदाची चड्डी नको; कारण मी आतां मोठा झालों' असें तो म्हणूं लागतो. परवां असाच एक दिवस तो दादाची एक जुनी विजार अडकवून

बसला होता. आम्ही समोर कार्यालयांत काम करीत होतो. माझें घर व कार्यालय समोरासमोरच आहे. जेव्हा जरूर पडेल तेव्हां दोघांनींहि समोर जाऊन काम करायची आमची पद्धत आहे. दिवाळी अंकाचें काम ऐन भरांत आलें होतें; आणि आम्ही दोघेहि कामांत गढून गेलों होतों. इतक्यांत मला समोरून श्रीकरची हांक आली, म्हणून मी गॅलरींत आलों. ' मला विजारीला पट्टा आणून द्याल कां? ' असें तो मला विचारीत होता. आणि प्रश्न विचारतां विचारतांच तो पळत समोर यायला निघाला. मी बाहेर येऊन पाहतों तो, श्रीकर धावत रस्ता ओलांडीत होता. त्याची मान खाली होती; त्यामुळें त्याचा चेहरा मला दिसत नव्हता. त्याचे हात त्याची सैल होणारी विजार सांवरीत होते. आणि तरीहि तो हरणाच्या चपलतेनें धांवत होता. तो नेहमींच असा जोरानें धांवतो. त्याचे पाय तरी जमिनीला टेकतात कीं नाही असें वाटत होतें. तें दृश्य बघतांना, वरून कॅमेरा धरून घेतलेल्या फोटोसारखें दिसत होतें. आणि तें पाहतां पाहतां मला संभ्रम उत्पन्न झाला कीं, हा अविनाश कीं श्रीकर? वास्तविक दोघांच्या वयांत चांगलें सहा वर्षांचें अंतर आहे. अविनाश बारा वर्षांचा तर श्रीकर सहा वर्षांचा. पण मला अजूनहि गंमत वाटते कीं, मला हा भ्रम का व्हावा? तो श्रीकर आहे, त्यानेंच मला हांक मारली होती, तोच धांवत आहे हें मला माहीत होतें तरी हा भास मला कां व्हावा? मग माझ्या लक्षांत आले कीं, परवां अविनाशच्या मुंजींतले फोटो पाहत असतांना श्रीकरमध्यें आणि या अविनाशमध्यें किती विलक्षण साम्य आहे तें आम्ही पाहिलें होतें व त्यावर आम्ही बोललोहि होतों. एकच मनुष्य आपण रोज पाहत असलो म्हणजे त्याच्यांत होणारा फरक आपल्या लक्षांत येत नाहीं. पण केव्हांतरी मागली स्मृति चाळवते; कारण प्रत्येक वेळीं आपण एखादी व्यक्ति बघतों ती त्या त्या क्षणीं कांहीं एका विशिष्ट दृष्टिकोनांतून बघत

असतो. अंतर्मनांत घोळत असलेल्या विचारांचाहि त्या दृष्टिकोनावर परिणाम होत असावा आणि म्हणूनच अविनाशची विजार घालून धांवत येणारा श्रीकर मला अविनाशसारखा भासला असावा.

ते कसेंहि असो, पण एक गोष्ट मात्र खरी कीं, अविनाश लहान न होतां श्रीकर मात्र मोठा होत होता आणि तें माझ्या लक्षांत आलें होतें. आणि तोच विचार मला अस्वस्थ करीत होता. एकदां डॉ. राधाकृष्णन् यांनीं आमच्या कॉलेजांत व्याख्यान देतांना 'बाल्यभाव वाढवा' असा उपदेश आम्हांला केला होता. आणि ते किती अवघड आहे याचें प्रत्यंतर माझ्या तीन मुलांच्याकडे बघतांना मला येतें. मला कामानिमित्त नेहमींच मुंबईला जावें लागतें व परत येतांना खेळ व खाऊचा कर मुलांच्याकरितां आणावाच लागतो. अविनाश लहान असतांना तर तो ठरल्यादिवशीं माझी वाट पहात जागत रहायचा. आणि एखादे दिवशीं गडबडींत खाऊ आणायचा राहिला तर बसमधून उतरल्यावर टिळक-रोडवरच्या लकी रेस्टॉरंटमधून मला त्याच्याकरतां 'मुंबईचा खाऊ' घेऊन घरीं जावें लागे. आतां मात्र अविनाशला स्वस्त आणि महाग कंपासमधला फरक समजतो आणि कॅमेरासुद्धां वापरायचा तर तो भारी कां असावा याच्यावर तो साधार विवेचन करतो. उलट अजून श्रीकरला चार रुपयांचा शर्ट आणि चार आण्यांचा प्लास्टिकचा खेळ यांतला 'मौलिक' फरक कळत नाहीं. कमरेला पट्टा नसला तरी रिबनसुद्धां किती छान दिसेल हें मी त्याला अजूनहि पटवून देऊं शकतो.

तो अडीच वर्षांचा असतांना त्याचें ऑपरेशन करावें लागलें. त्याला भूल देत असतांना त्यानें मला हांक मारली व मी त्याचा हात धरून त्याच्याजवळ उभा राहिलों. तेवढा धीर त्याला पुरला. दुसरे दिवसापासून डॉ. दातारांना 'आजोबा' म्हणून त्यानें आपलें त्यांच्याशीं नातें जमवलें. तिथल्या आठ दिवसांत सख्ख्या नातवासारखीं शुश्रुषा व कौतुक त्यांच्याकडून करवून घेतलें. त्यानें जोडलेला तो ऋणानुबंध

अजूनहि कायम आहे. निरागस बालस्वभावांतून निर्माण होणारें हें सामर्थ्य पुढें टिकतं कीं नाहीं कोणास ठाऊक! आज मात्र तें पदोपदीं जाणवतें. मुलें आपसांत दिवसभर भांडतात, वेळप्रसगीं मारामारीसुद्धां करितात, पण तें सगळें एका क्षणांत विसरून पुन्हां गळ्यांत गळासुद्धां घालतात. असें निरोगी मन प्रौढ माणसाचें सहसा असूं शकत नाहीं. परिस्थितीनें भेदरलेला, पूर्वग्रहांनीं पछाडलेला, ग्रहस्थितीनें गांजलेला असा जरी एखादा मनुष्य असला तरीसुद्धां त्याला जर दोन गोजिरवाणीं बाळें असतील तर त्याचा सगळा ताप नाहींसा होईल.

प्रौढ माणसाला 'बाल्यभाव वाढविणें' जरी शक्य नसलें तरी मुलांच्या सहवासांत त्याचा बाल्यभाव जागृत तरी खास होईल. श्रीकर आत्तांच निजून उठला आहे. अंथरुणांत पडल्या पडल्याच मला विचारतो आहे, 'नाना, त्रिचूरला शुभी आतां काय करीत असेल हो? अजून निजली असेल कीं दूध पीत असेल?' असा अगदीं साधा प्रश्न असतो, पण त्यानें आपले मन आंतपर्यंत हालतें.

एकत्र ठेवलेल्या गोगलगाई वेगवेगळ्या गांवांत नेऊन त्यांचें तारायंत्र करतात असें म्हणतात त्याची मला आठवण होते. तिकडे शुभी अशीच बाबूची आठवण काढीत असेल आणि मग तिची मावशी तिला चिडविण्याकरितां म्हणेल, 'मग जातेस कां बाबूकडे परत? जा एकटी!' पण त्यावर शुभी हरेलच असें नाही. ती म्हणेल, 'हो जाते. दे मला पुण्याच्या डब्यांत बसवून. माझे नाना येतील स्टेशनवर!'

आणि म्हणूनच ना कितीहि भांडली तरी मनस्ताप होत नाही. कारण तो त्यांच्या प्रेमाचाच आविष्कार असतो. तें त्यांचें भांडणें व एक होणें यांतच आमच्या श्रमांचा, संतापाचा परिहार होतो. एखादे दिवशीं भांडणांना अगदीं ऊत आलेला असतो. त्यांच्या भांडणांना कंटाळून मी कुठेंतरी बाहेर निघून जातो. पण आई कुठें जाणार? मी

रात्रीं परत आलो म्हणजे ती मला म्हणते, 'आज अगदीं यांनीं कहर केला भांडणाचा. अंथरुणावर पडल्यावरसुद्धां यांचें भांडण चालूंच होते. शेवटी मी दोघांनाहि दोन दोन धपाटे दिले आणि एकमेकांच्या अजिबात जवळ जायचें नाही असें बजावून आंत आलें. आतां झोंपली वाटते!' त्यावर तिला हांक मारून मीं म्हणतो, 'अग लता, बघ तर खरी गंमत!' आणि मग लता बाहेर येते. निजतांना एकमेकांशीं भांडल्यामुळें दूर दूर निजलेली श्रीकर-शुभदा सरकत सरकत एकमेकांच्या जवळ आलेली असतात. शुभीचा हात बाबूच्या गळ्यांत असतो. श्रीकर जास्त भावनाप्रधान आहे. तो झोंपेंत मधूनमधून मुसमुसत असतो; पण शुभीचें रडणें कुठल्याकुठें पळून गेलें आहे. तोंडावर तिचें तें गोड गोड हंसू आहे. पापण्यांच्या पाकळ्या मिटलेल्या असल्या तरी सगळा गोडवा मुखावर उमटलेला आहे.

भांडण संपलेलें आहे. संघर्ष शिल्लक उरलेला नाहीं. उरलें कांहीं असेल तर तें निर्व्याज प्रेम, निरागस बाल्यभाव आणि सगळ्या घरादारालाच नव्हें तर येईल जाईल त्याला सदैव प्रसन्न करणारे स्मिताचें किरण! त्यांना जवळ घेऊन त्यांचें चुंबन घ्यावें म्हणून मी आवेगानें खालीं वांकतों तोंच मला अडवीत लता म्हणते, 'छे, छे! निजलेल्या बाळांचा मुका घ्यायचा नसतो—'

अविनाश, शुभा आणि श्रीकर या त्रिदळांतळें एक पान जरासें बाजूला झाल्याबरोबर हीं दोन पानें किंचित् मलूल झाली आहेत. 'शुभी नाहीं मग भाऊबीजेची कसली गंमत?' म्हणून अविनाश कुरकुरत आहे. श्रीकर मधूनच तिची आठवण काढीत आहे. शुभी नाहीं म्हणजे आईला काम नाहीं, म्हणून मला तिच्यावर ओरडावें लागत नाहीं, म्हणून मीहि बेचैन आहे. आणि हें सगळें कां? तर आज शुभी त्रिचूरला गेली आहे!

प्रसाद, दीपावलि १९५५





८

# चिमी : एक तत्त्वज्ञान

बुंड्याचीं दोन्ही पिलं मीं आमच्या गवळ्याला देऊन टाकली तेव्हां कल्पना नव्हती कीं बंड्या घरांतनं गेला आहे तो कायमचा. मला एकदां अंधुकशी शंका आली होती कीं बंड्या आणि त्याच एक भावंड मोठं झाल्यावर चिमी जशी आमच घर सोडून गेली तसा बंड्या पण एखादे वेळीं आमचं घर सोडील. पण तो नाहींसाच होईल आणि आमच्या मनाला अशी रुखरुख लावून जाईल अस मात्र मला कधींच वाटल नाहीं. कारण पिलं मोठीं झाली म्हणजे मांजरीला तीं नकोशीं होतात इतकंच नव्हे तर पिलांनीं राहतं घर सोडल नाहीं तर मांजरीच घर सोडते हें चिमीच्या उदाहरणावरून आम्हांला चांगल माहीत झाल होतं. आपल्या नवजात अर्भकांना बोक्यापासून प्राणपणान जपणारी मांजरी, रात्रीं अपरात्रीं त्याच्यासाठीं उंदीर पकडून आणून त्यांना त्याची चटक लावणारी मांजरी आणि त्यांना वेड्यावांकड्या उड्या

मारावयाला लावून पंजाचे वार करायला शिकविणारी मांजरी, पिलें दोन महिन्यांचीं झालीं कीं त्यांच्यावर फिसकारायला लागते; त्यांना दूर लोटते आणि अखेरीस आपलं इतके दिवसांचं घर सोडून जाते हें पाहून आश्चर्य वाटतं. पण तसं घडतं खरं !

चिमी घर सोडून गेली आणि दोन पिलं आमच्या घरीं राहिली. त्यांपैकीं एक काळं होतं तें आपल्या आईसारखं चपळ पण शांत होतं. दुसरं पांढरंशुभ्र पण एकसारखं म्यांव म्यांव करणारं होतं. या दोन्ही पिलांचीं नांवं त्यांना बोके समजून मुलांनीं ' बंड्या ' व ' गुंड्या ' अशीं ठेवलीं. मला मांजरांचा कंटाळा. चिमी घर सोडून गेली. आणि बंड्या सारखा कटकट करायचा. तेव्हां मी वैतागून म्हणायचा, ' आतां हीं पिलें जर कोणी नेईल तर बरें होईल ! ' आणि हें ऐकून आमच्या वाड्यांत आलेल्या एका पाहुण्यांनीं तीं पिलें न्यायचीं ठरविलें. त्यांना तीं फार आवडली होतीं. दुसरे दिवशीं पहांटे गांवाला जायला निघतांना ते पिलांना शोधत असल्याचें माझ्या लक्षांत आलें. कारण तेव्हां मी जागा झालो होतो. ' दोन्ही पिलें नेलीं तर मुलें नाराज होतील तेव्हां एक तुम्ही न्या ' असें त्यांना उठून सांगावें असें माझ्या मनांत आलें. पण मीं मन घट्ट केलें. मनांत म्हटलें, ' अनायासें पीडा जात आहे तर जाऊं दे; चार दिवस मुलें नाराज होतील पण मग विसरतील. ' पण शेवटीं माझीच फजिती व्हावयाची होती. कारण सकाळीं घरांत येतों तो चुलीपाशीं बसून दुधाकडे तोंड करून बंड्या त्याचें म्यांव म्यांव गीत आळवीत होता. पाहुण्यांना तो सांपडलाच नव्हता म्हणून ते फक्त गुंड्याला घेऊन गेले होते.

पण बंड्यानें पुढें सगळ्यांचीच फजिती केली. थोड्याच अवधींत लक्षांत आलें कीं तो ' बंड्या ' नसून ' बंडी ' आहे.

चिमीच्या दर चार महिन्यांनीं होणाऱ्या बाळतपणांनीं आम्ही वैतागलों होतों. त्याला मध्यंतरीं खळ पडला होता. पण आतां त्याची पुरेपूर भरपाई होणार होती. पण बंड्या बंडी ठरला तरी 'तो बंड्या' हें नांव मात्र कायम झालें; आणि आल्यागेल्याला 'बंड्याला पिलें झाली' हे ऐकून विस्मयाचा झटका बसूं लागला आणि मग आमचीं नि त्यांचीहि हंसून करमणूक होऊं लागली.

बंड्या राहिला म्हणून मुलें मात्र एकदम खुष झाली. अंगावरचे थोडेसे आणि शेपटीवरचे थोडेसे ठिपके सोडले तर बंड्या अगदीं पांढराशुभ्र अन् गुबगुबीत होता. त्याची शेपटी चिमीच्या शेपटीसारखीच गोंडेदार होती. आणि पाहील त्यानें खुष व्हावें असेंच तें मांजर होतें. पण चिमीची सर त्याला नव्हती. चिमीचा रुबाब, तिचें चापल्य आणि तिचें क्रौर्य याचा बंड्यांत अभाव होता. बंड्या अगदीं शेळपट होता. पण तो घरांत चिमीहून जास्त रुळला. आल्या गेल्याला तर बंड्या म्हणजे एक कौतुकाचा विषय होता. नाराज होतो तो फक्त मी! आणि माझी नाराजी अनेक तऱ्हेची होती. मला मांजर घरांत नको होतें. त्याचीं बाळंतपणं दर चार महिन्यांनीं येत. पण जन्माला येणारीं गोजिरवाणी पिलं बोक्यानें खावीं हेंहि मला सहन होत नव्हतें. आणि तीं पिलें जगवायसाठीं माझ्या जिवाची उलघाल सुरू व्हायची. माझा दुबळेपणा मला कळत होता. पण स्वभावाला औषध काय? मात्र मांजर घरांत बाळगण्यापासून मुलांना व घरांतल्या इतरांना जरी अपरंपार आनंद झाला तरी परवांपर्यंत म्हणजे बंड्या घरांतून नाहींसा होईपर्यंत सहा सात वर्षं चिमीपासून तीन पिढ्यांच्या सहवासांत झालेल्या मनस्तापानें मी तत्त्वज्ञ बनलों हा कांही थोडाथोडका लाभ नाहीं.

हें तत्त्वज्ञान मीं कसं आत्मसात् केलं ते कळायला थोडा

इतिहास सागायला हवा. त्याच असं झाल...

आमच्या घरांत चिमीचें स्थान केवळ अद्वितीय होतें. मला नको असलेला आणि मी हरतऱ्हेनें घराबाहेर काढून लावायाचा प्रयत्न केलेला हा प्राणी परवापर्यंत बंड्याच्या रूपानें माझ्या घरांत ठाण मांडून बसलेला होता. एका परीनें हा माझा पराभवच असला तरी कांहीं गोष्टी तिनें माझ्या भीतीनें सोडल्या असें म्हणावयास हरकत नाही. म्हणजे तिनें अभक्षभक्षण सोडले किंवा कुटुंबनियोजन अमलांत आणलें असें नव्हे. पण तिच्या कर्तृत्वाचा उपसर्ग मला न होईल आणि माझ्या काठीचा उपसर्ग तिला न होईल इतक्या बेतानें ती वागूं लागली.

मला खरोखरीच कुठलेच प्राणी घरांत संभाळायला आवडत नाहींत. कुत्र्याप्रमाणें माकड संभाळणारे आणि तें सांखळीला बांधून आपल्याबरोबर फिरवणारे सुशिक्षित-अशिक्षित डोंबारी आपण पाहिले असतील. मुंगूस पाळून तेंहि बरोबर हिंडवणारे अनेक लोक आपण बघतो. नाग संभाळणारेहि अनेक लोक आपण पाहतो. घरांत ठेवायचं माशांचं तळं तर विकतच मिळतं, राघू मैनांचे पिंजरे दारावर विकायला येतात आणि कुत्रीं व मांजर यांचं माणसांवरचं आणि माणसांचं त्यांच्यावरचं प्रेम तर विचारायलाच नको. पण यांपैकीं कुठलाहि प्राणी मला माझ्या घरांत नकोसा वाटतो. मात्र या बाबतींत मुलांच्या आवडी माझ्यापेक्षां अगदींच वेगळ्या आहेत. सर्व तऱ्हेचे प्राणी पाळून घराचाच पेशवे पार्क करायलाहि त्यांना मनापासून आवडेल.

त्यांना घरांत प्राणी बाळगायची आवड आणि मला तर तें मुळींच नको अशा संघर्षातून सरतेशेवटीं मांजर पाळण्याला मी संमति दिली. एकदां पोपट आणला तो संधि साधून उडून गेला. कुत्रा हा प्राणी मालकाखेरीज इतर सर्वांना त्रासदायक असतो.

आणि त्याची नीट निगा राखणें ही खर्चाची गोष्ट असते तेव्हां 'आपण बंगला बांधू तेव्हां कुत्रा पाळायचा' असा हवाला देऊन मी मोकळा झालों. पण मुलांनीं 'निदान मांजर घरांत आणायला काय हरकत आहे?' असा सवाल टाकला तेव्हां मात्र मला 'नाही' म्हणवेना.

'आहे कुठें एखादी चांगली मांजरी?' मीं विचारलें.

'हो, आहे ना! ते शेजारचे पटवर्धन गांवाला गेले आहेत; त्यांच्याकडची मांजरी फार सुंदर आहे. पांढरी पांढरी शुभ्र! आणि तिचें शेपूट तरी किती गोंडेदार आहे.' श्रीकर म्हणाला.

'आणि, बरं का हो नाना, ते पटवर्धन आतां खूप दिवस येणार नाही आहेत. तोंवर ती चिमी सहज आपली होऊन जाईल. आपण तिला दूध घालूं. नि ती शेव-भजीसुद्धां खाते!' आळींभर आपलेपणानें हिंडणाऱ्या शुभदानें माहिती पुरवली.

'आणि नाना, ती चिमी आहे ना; ती कांहीं गांवठी माजर नाहीं. तो शेजारचा प्रकाश म्हणत होता कीं ती इराणी जातीची आहे. तुम्ही एकदां ती पहा तर खरी!' अविनाश सांगूं लागला.

'म्हणजे एवढ्यांत तिचें नामकरणसुद्धां तुम्ही उरकलेंत सगळ्यांनीं मिळून? तिला घरीं आणायचा तुमचा कट आधींच ठरलेला दिसतोय्!'

"नाना, ती फारच छान आहे हो!' माझ्या प्रश्नाला बगल देत तिघांनीं म्हटलें, 'आणूं का आम्ही तिला घरांत?'

'आणा. पण माझ्या घरांत तिनें उंदीर खातां कामा नये.' मी माझी म्हणून एक अट घातली.

मी मनाशीं विचार केला कीं, ही मुलं मांजर पाळणार पाळणार म्हणजे काय, तर तिला दोन वेळां दूध घालणार आणि

ती दूध प्यायला लागली म्हणजे तिला कुरवाळणार. पण माजराची जात कशी असते हें मला माहीत असल्यामुळें मी निश्चिंत होतो. आमच्या लहानपणीं आमची एक शेजारीण कांहींतरी मागायला यायची. अगदीं नम्र आणि गोड शब्दांत हवा तो जिन्नस मागायची. आणि तो जिन्नस मिळाला कीं लगेच निघून जायची. त्या बाईबद्दल आमची आजी म्हणायची, 'मेली मांजरीची जात ! दूध प्यायली कीं लगेच अंग झटकून चालायला लागते. तिचा ऋणानुबंध दुधापुरता.' आजीच्या तोंडून हे वारंवार ऐकल्यामुळें मी खाची बाळगून होतो कीं, मुलांना चिमीचा लळा लागला तरी चिमीला मुलांचा लळा लागणार नाही. आणि असा सोयीस्कर विचार करून चिमीच्या घरांतील प्राणप्रतिष्ठेला मी मान्यता दिली.

पण माझा अंदाज सपशेल चुकला होता. पाहतां पाहतां चिमी आमच्या घरांतील एक अविभाज्य घटक बनली. मला वाटे चिमीचे फार लाड न करण्याच्या बाबतींत माझी पत्नी तरी माझ्या बाजूची असेल पण तिनेंहि मुलांच्यापुढें हात टेकले होते आणि मुलांनीं मागायच्या आंतच चिमीचें दूध ती बशींत ओतून ठेवूं लागली होती. मुलांना तर चिमीवांचून दुसरी करमणूक नव्हती. आणि चिमीहि होती खूप छान. चेहऱ्यावरचा थोडासा पिंगट रंग सोडला तर बाकी पांढरीशुभ्र; गुबगुबीत शरीर व पिंगट पट्टे असलेली गोंडेदार शेपटी आणि तिच्या हालचालींतला डौल, सगळेंच मोठें मोहक होतें.

पण चिमी कितीहि सुंदर असली तरी तिनें सुरू केलेला उपसर्ग मात्र सुखद नव्हता. मांजर उंदीर खाणारच हें मला माहीत आहे पण त्या मांजरानें उंदीर पकडून तो निवांतपणें खाण्यासाठीं आरामशीर जागा म्हणून माझ्या घराचा उपयोग करावा हें मला मान्य नव्हतें. आणि म्हणूनच चिमी घरांत

उंदीर घेऊन आली म्हणजे मी काठी घेऊन तिच्या मागं लागत असे. आणि मग दिवस गेलेल्या चिमीला माझी काठी वर्मी लागूं नये म्हणून अविनाश घाबराघुबरा व्हायचा. कांहीं दिवस तर चिमीनें हा क्रमच सुरू करून उच्छाद मांडला होता. मी मारायला आलों कीं आपल्या भक्ष्यासकट पलंगाखाली ट्रंकांच्या मागं लपून ती भयंकर आवाज करायची. मग मी आणखीनच जिद्दीला पेटायचा. पुढें पुढें चिमीनें उंदीर आणला कीं अविनाश माझ्या खोलीचें दार बंद करून घ्यायचा आणि हाश् हुश् करीत अहिंसक पद्धतीनें तिला बाहेर घालवायचा.

पण अविनाशच्या आजीची यावरहि कडी असे. 'मांजर उंदीर खाणारच; तिचं भक्ष्यच आहे तें! होऊं दे खाणं तिचं. तिला नका मारूं. उगीच वर्मी लागून मेली तर पाप लागेल.' असं ती म्हणायची.

'आहे काय ही तऱ्हा ? त्याच तोंडानं येऊन चिमी दुधांत तोंड घालते त्याची तरी किळस वाटूं दे जरा !' असं मी म्हणे. त्यावर तिला जवळ घेऊन पानांतला दूधभात कालवून देत त्या म्हणत, 'मांजराचं तोंड अशुद्ध नसतं; तें काय कुत्रं आहे ?'

'खरंच आहे. तिचं तोंड अशुद्ध कसं असेल! ती दबा धरून बिळांतली कंदमुळं खाते. अन् उड्या मारून आकाशांतली फळं तोडते. वर घरांतलं दूध पिते. तिच्याइतकं पवित्र कोण असणार !' असं मीं म्हटलं तरी त्या वक्रोक्तीचा कुणाच्याच मनावर परिणाम व्हायचा नाहीं. फक्त सगळींजणं तोंड भरून हंसत मात्र.

अशा एकंदर संघर्षांत चिमीचं घरांतलं वास्तव्य चालू होतं. मुलं खूष होतीं. चिमी आरामांत होती. मी अधूनमधून संतापत होतों. पण हळूं हळूं मीहि संताप आवरूं लागलों. माझ्यासमोरच्या टेबलावर

बसून लोक कोंबडी अगर मासे खातात त्या वेळी मी काय करतां ! प्रथम मला त्या दृश्यान मळमळायचं. पण नंतर पहायची सवय झाली. मी फक्त 'दृष्टिआड सृष्टि' हें तत्त्वज्ञान पत्करलं. माझ्या डोळ्यांसमोर कांही घडूं नये येवढी काळजी मुलंहि घेऊं लागली.

हळूं हळूं मी चिमीच्या जीवनाकडे अलिप्तपणें पाहूं लागलों.

चिमीचा रुबाब विलक्षण होता. चालणं अर्थात् मांजराच्या पावलान. येणं जाणं, बसणं उठणं शांतपणें. कुठेंतरी अंतराळांत दृष्टि लावून ती बसल्यासारखी दिसे. चारदोन वेळां दूध प्यायला हजर होईल तेवढीच, बाकी शिकार पहात गांवभर हिंडेल. मुलांशीं खूप दोस्ती. धाकटा मुलगा तर तिला उचलून मानेभोंवतीं लपेटायचा, तिच्या डोळ्यांत पहात बसायचा, अंधारांतसुद्धां चिमीचे डोळे चकाकतात म्हणून सांगायचा. दर चार महिन्यांनीं ती तीनचार पिलांची माता व्हायची. माता व्हायच्या पंथांत असली म्हणजे तिच बाहेरच हिंडणं कमी व्हायच. दूध पिऊन ती घरांत कोचावर नाहींतर कॉटवर तासन्तास सुस्त पडून रहायची. अविनाशचा अभ्यास चालू असला तरी चिमीला मांडीवर घेऊन तिचं कौतुक करीत तो चालू असायचा.

पण एका क्षणीं अशी गोगलगाय असणारी चिमी दुसऱ्या क्षणीं वाघीण बनते हे दृश्य मात्र विलक्षण होते. असाच एकदां अविनाश तिला मांडीवर घेऊन बसला होता. तेथून ८–१० हातांवर देवघराची खिडकी होती. आणि स्वस्थ बसलेल्या चिमीनें एकदम विलक्षण वेगानें खिडकीकडे झेप घेतली. अविनाश 'चिमे ऽ' म्हणून ओरडला. आम्ही बघूं लागलो तर अविनाशच्या मांडीवरून वेगानें बाहेर पडतांना चिमीनें नकळत त्याच्या हातापायांना ओरबाडलें होतें आणि डोक्यांत एवढा संताप घेऊन चिमीनें उडी कां घेतली तर खिडकींत तिला एक चिमणी बागडतांना दिसली होती.

चिमीनें काढलेलें रक्त अविनाश लौकरच विसरला. पण माझ्या मात्र तें कायमचें लक्षांत राहून गेलें आहे. कारण खिडकींतून येऊन एखादा दाणा नेणारी आणि मुक्त मनानें बागडणारी चिमणी हा माझा आवडता प्राणी आहे. कुठलीहि चिमणी मीं पाळलेली नाहीं. कदाचित् कालची चिमणी आज न येतां दुसरीच आली असेल व उद्यां पुन्हा तिसरीच येणार असेल पण मला मात्र खिडकींत येऊन बसणारी आणि बागडणारी एकच चिमणी ठाऊक आहे. आणि अशा माझ्या त्या आवडत्या चिमणीवर चिमीनें अकारण झडप घालावी ही गोष्ट मला भयंकर संतापजनक वाटते. मांजराचें उंदराशीं वैर असतें, उंदीर हा मनुष्याचा शत्रू आहे, तो मांजराचें भक्ष्य आहे आणि म्हणून मांजर माणसाचा मित्र आहे हें व्यावहारिक तत्त्वज्ञान मला समजूं शकतें. पण तिच्या-पेक्षां दुबळा असणारा प्रत्येक प्राणी चिमीचें भक्ष्य असावा — निदान जीवधेणें वैर असलेला शत्रु असावा आणि वैरभाव प्रकट करतांना चिमीनें तिला दूध घालणाऱ्या आणि पोराप्रमाणें गोंजारणाऱ्या माणसाला आपण आपल्या भयंकर नखांनीं इजा करतो आहोंत याचें भान ठेवूं नये ही गोष्ट तिच्या, 'मांजराच्या' स्वभावाशीं सुसंगत असेल कदाचित् पण मला मात्र मनोमन न पटणारी आहे. निदान मग मी चिमीला मित्र मानणार नाहीं. सौजन्याचा मूर्तिमंत पुतळा भासणारा एखादा माणूस त्याच्या स्वार्थाचा लहानसा मुद्दा उपस्थित झाला म्हणजे जेव्हां क्षणांत रुद्रावतार धारण करतो तेव्हां त्यावेळच्या आपल्या वर्तनाचा भोंवतालच्या लोकांच्या मनावर काय परिणाम होतो याचा विचारहि करीत नाही किंवा तो करायचें भान त्याला उरत नाहीं; तेव्हां त्याच्याबद्दल आपल्या मनांत जी घृणा उत्पन्न होईल तीच मला चिमीच्या वर्तनानें उत्पन्न झाली.

चिमीचा मला संताप यायला आणखी एक कारण घडलें. एकदां रात्रीं कुत्र्याच्या पिलाचें केंविलवाणें केंकाटणें दाराशीं ऐकून मी जागा झालो. त्याच्यामागें दुसरें कुत्रें लागलें होतें व तें जोरानें गुरगुरत होतें. मी खोलीच्या बाहेर आलों आणि पडवीचें दार उघडलें. त्याबरोबर तें घाबरलेलें पिलू चट्कन आंत आलें. लगेच, मी दार पुन्हा बंद केलें. तें पिलू तिथें भिंतीशीं सायकली होत्या त्यांचेमागें जाऊन लपलें. तें अजूनहि कांपत होतें; व अधूनमधून केंकाटत होतें. मी पुन्हा खोलीत येऊन दार लावून निजलों. कांहीं वेळानें बाहेर पडवींत तें पिलूंहि शांत झालें. मी निजलों खरा पण अंतर्मनांत कांहींतरी खटकत होतें. पहांटे गवळ्याच्या पहिल्या हांकेनें मी अर्धवट जागा झालों. त्याच्या दुसऱ्या हांकेला अविनाशनें माजघराचें दार उघडल्याचा आवाज झाला आणि मी खाडकन् उठलों. माझ्या एकदम लक्षांत आलें कीं आतां चिमी दुधासाठीं हजर होणार आणि त्या राक्षशिणीपासून त्या कुत्र्याच्या पिलाला धोका आहे. मी बाहेर येऊन 'अविनाश, अविनाश, माजघराचें दार लाव' असें म्हणेपर्यंत चिमी तेथें अवतीर्ण झालीच. तिनें तें पिलूं बघितलें आणि शेपूट उभारली, मिशा फिस्कारल्या आणि उडी मारायचा पवित्रा घेतला. येवढ्यांत मी ओरडलों, "अवी, काठी घे अन् चिमीला हाण.' त्याच्या लक्षांत येण्यापूर्वींच चिमीनें झेंप घेऊन त्या पिलाला एक पंजा हाणलाच. मग मात्र अवीनें चिमीची शेपूट धरून तिला मागें ओढलें आणि मीं तिला लाथेनें ढकललें. काठीचा आणखी एक फटका बसतांच ती दाराबाहेर पळाली.

आतां मला चिमी घरांत अगदीं नकोशी झाली होती. पण आतां करायचें तरी काय? चिमीला घालवणार तरी कशी? आणि चिमीच्या विरुद्ध मी एकटा तर तिच्या बाजूनें सगळे! पण हा

प्रश्न एक दिवस अचानक सुटला. चिमीच्या तीनचार खेपांचीं पिलें बोक्यांनीं मारली, मोठीं होऊन घरांतून पळून गेलीं वा कोणीं तरी नेली. पण कायम वस्ती कुणाचीच राहिली नाहीं. पण बंड्या जेव्हां आमच्या घरांत कायम राहिला तेव्हां चिमीनें घरांतून काढता पाय घेतला तो कायमचाच. पिलं मोठीं झाली म्हणजे त्यांचा दुस्वास करायचा हा मांजराचा धर्म. पण आतां-पर्यंत चिमीला पुरून घरांत कुणी उरलें नव्हते. पण जेव्हां बंड्या घरांत राहिला इतकेंच नव्हे तर सगळ्यांचाच आवडता झाला तेव्हां चिमीनें आमचें घरच सोडलें. रस्त्यांत हांक मारली तर क्वचित् वळून पहायची; ओस्र्यावरच्या जिन्यानें वरच्या बिऱ्हाडांत जायची. पण घरांत यायची नाहीं. मुलांना त्याचें जरा वैषम्य वाटे कारण कशीहि असली तरी चिमी त्याना आवडत होती. पण बंड्या त्यांना मिळाला असल्यामुळें त्याचें फारसे दुःख वाटत नसे.

पण मला मात्र बंड्याचा त्रास जास्त वाटूं लागला. चिमी दोनतीन वेळां दूध प्यायली कीं पसार व्हायची. बंड्या मात्र सारखा 'म्यांव, म्यांव' करत रहायचा. त्याला खळ नसे. त्याला दूध तरी किती वेळां लागे! शिवाय तो बाहेर जाऊन शिकार करीत नाही म्हणून दूधभात, दूधपोळी द्या असें त्याचें कौतुक होऊं लागले. नतर मग त्याची बाळंतपण. त्यामुळें तर कहर झाला. चिमीच्या अंगांत पिलांचे रक्षण करण्याचा पराक्रम तरी होता, पण बंड्या अगदींच मेषपात्र! त्याला पिलें व्हायचीं तीं सगळीं सुंदर. पिलें झाली कीं घरां-तली आणि बाहेरचीं मुलें जमून तासन्तास त्यांच्याकडे पहात बसायची. तीं पिलं पाहिलीं कीं बोका ह्यांना मारील अशा भीतीन मी त्यांना जपायचा आटोकाट प्रयत्न करी. आमच्या

सौभाग्यवतीला या गोष्टीचें हंसूं यायचें व रागहि यायचा. ती म्हणे, 'मरेनात कां तीं पिलं ? तुम्हांला नकोत आहेत तीं. बंड्यासुद्धां तुम्हांला नको आहे.'

मी म्हणायचा, 'तुला नाहीं तें समजणार!' आणि एक दिवस तिच्यासमोर जेव्हां बोका एक पिलूं उचलून न्यायला आला तेव्हां तिनं पाट फेंकून त्याला मारला आणि पिलूं वांचवलं. तेव्हां मी तिला म्हटलं, 'याला म्हणतात आपला स्वभाव ! जगांत काय घडतं, तिथ आपण काय करतों, वगैरे तत्त्वमीमांसा खरी असली तरी तुझ्या नि माझ्या स्वभावाला समोर घडणारी हत्त्या बघवतच नाहीं हे अधिक खरं! मला मांजरानं चिमण्या मारलेल्या खपत नाहींत तसं बोक्यानं नवजात पिलं मारलेली बघवत नाहींत. दृष्टिआड सृष्टींत काय घडेल तें घडोः दृष्टीसमोर घडूं नये म्हणून आपण प्रयत्न करायचा!'

'पण हा मनस्ताप तुम्ही कायमचा मागे लावून घेतां!' ती म्हणाली.

'म्हणूनच म्हणतो कीं आपण बंड्याला कोणाला तरी देऊन टाकूं या!'

पण तें शक्य नव्हतं. बंड्या देऊन टाकायचा म्हटलं—आणि त्याला कुणींहि खुषीनं नेला असता—कीं घरांतली सगळीं माणस व्याकुळ होत. शेवटीं मीं मनाशीं ठरवल कीं हा विषय डोक्यांतून काढून टाकायचा. कारण घरांतलीं सगळीं माणसं नाराज झाली तरी मला सुख लागायचं नाहीं. सगळी धडपड शेवटीं सुखासाठींच ना? आणि सुखदुःख म्हणतात तें तरी शेवटीं मनाचंच कीं नाहीं? अशा स्थितींतच इतिहासाची पुनरावृत्ति होत होती. बंड्याचीं तीनचार बाळंतपणं झाली.

त्यांतली कांहीं पिलं बोक्यानं खाल्लीं. कांही लोकांनीं नेली. पानशेतच्या पुराआधीं दोन महिने बंड्याला सुरेख पिलं झाली. एक पांढरंशुभ्र आणि गुबगुबीत अन् दुसरं काळं नि तुडतुडीत... मांजराच्या पिलाच बागडणं ही मात्र माझी अत्यंत आवडती करमणूक होती. डोळे मिटलेले असतात तेव्हांपासून मोठीं होत होत दोन महिन्यांत तीं किती खोडकर आणि चपळ होतात, दिवसादिवसांत त्यांच्यांत कसा बदल घडतो हें पहाणं आणि दोन पिलांचं एकत्र खेळणं मोठं मनोरजक 'असे. मला कुणीं पिल मागितली तर मी म्हणे, 'दोन एकदम न्या. मी त्यांची ताटातूट करणार नाहीं.' या खेपेला दोन्ही पिलं चांगलीं होतीं. आणि मग आमच्या घरांत पुन्हा तीं कुणाला द्यायचीं हा विषय सुरू झाला. मुलं म्हणत 'हीं दोन्ही पिलं फार छान आहेत.' मी म्हणे, 'मग बंड्या कुणाला तरी द्या.' मुलांचं मन द्विधा होई. विचार करून तीं म्हणत, 'तस नको. बंड्या आमचा आपला राहूं दे. पिलं द्या!' आमचा गवळी तीं न्यायला तयार झाला. असं करतां करतां पानशेत फुटलं. चार दोन दिवस दिवे, पाणी, दूध यांचे फार हाल झाले. पण त्याहि परिस्थितींत आम्ही पिलांना व बंड्याला दूध देत होतो. आमच्या गवळ्याच घर वाहून गेलं आणि म्हणून तोहि, पिल नतर नेईन असं म्हणूं लागला. पिलं मोठीं होऊं लागली. तशी बंड्या त्यांच्यावर फिसकारूं लागला. प्रथम घरीं कमी येऊं लागला. मग मला शंका आली कीं चिमीसारखं बंड्या आतां घर तर नाहीं ना सोडणार?

आणि बंड्यानं खरंच आमच घर सोडलं. पण चिमीपेक्षां किती वेगळ्या तऱ्हेनं! गवळी ज्या दिवशीं पिलं घेऊन गेला त्याच्या आदल्या दिवशीं सकाळीं चहाच्या आधींच मी बंड्याला व दोन्ही पिलांना कोठीच्या खोलीत दूध घातलं व मधलं दार लावून घेतल.

मला माहीत होतं कीं दूध पिऊन बंड्या खिडकींतून निघून जाईल पण पिलं जाणार नाहींत आणि मधलं दार लावतांच चहाच्या वेळीं पायांत पण घोटाळणार नाहीत. तसंच झालं. पण त्या वेळीं बंड्या जो गेला तो पुन्हा फिरकला नाहीं. येवढेंच नव्हे तर पुन्हा दिसलाच नाहीं. गवळी पिलं घेऊन गेला. तेव्हा माझ्या मनांत क्षणभर आलं कीं, आपण पिलं देऊन टाकतों आहोंत अन् कालपासून बंड्या आलेला नाहीं. पण मग हें मित्रं मांजर जाणार कुठें ? रात्रीं दुसऱ्या मांजरांशी भांडत बसलं कीं काठी घेऊन सोडवावं लागतं त्याला. तें जाणार कुठें ? पिलं घरांत नाहींत, वर पुन्हा एकट्याला मिळणार असं कळल म्हणजे परत येईल. पण छे ! दोन दिवस झाले, तीन दिवस झाले पण त्याचा पत्ता नव्हता. चिमी घरांतून गेली तरी रस्त्यांत दिसे, पण बंड्या कुठेंच दिसेना. मुलं जाऊन भोवतालच्या चार घरांत पाहून आलीं. पण बंड्याचा तेव्हांपासून अजून येवढासुद्धां पत्ता नाही. कोठीच्या खोलीतून शेवटचें दूध पिऊन जणूं काय तो जादूसारखा नाहींसा झाला. मुलं चारआठ दिवस चुटपुटली. जेवतांना प्रत्येकजण बंड्याची आठवण काढी. अविनाश सुटीत आला. त्यानं पहिला प्रश्न केला, ‘बंड्या कुठं आहे ?’ अजूनहि तो पत्रांतून विचारतो ‘बंड्या सांपडला का ?’

बंड्या हरवला हें खरं. मला वाटलं, ‘बंड्याला कुणींतरी त्याचं रंग, रूप, शेपूट पाहून उचलून नेलेल असावं. त्याच कांही बरंवाईट झालं नसलं म्हणजे मिळवलं. कारण, हल्लीं चिमीहि दिसत नाहीं व शेजारचा एक मुलगा सांगत होता कीं ती कुत्र्या-बरोबरच्या झटापटींत जखमी होऊन मेली. सहा ते दहा फूट उभी उंच उडी घेणारी, पिलं संभाळतांना बोक्याला आव्हान देणारी आणि कुत्र्याशीं लढाई करणारी चिमी वयोमानानं थक-ल्यामुळं लढाईत कामीं आली असणं शक्य आहे पण गरीब

बिचारा बंड्या ! त्याच्यावर जर असा कांहीं कठीण प्रसंग आला असला तर ? योगायोग असा कीं पिलं गवळ्यानं नेलीं म्हणून, बंड्या नाहीसा झाला म्हणून अन् चिमी मारली गेली म्हणून, आमच्या घराला सहासात वर्षे चटका लावणाऱ्या मांजराच्या तीन पिढ्या आम्हांला एकदम दुरावल्या. चिमीचा आणि आमचा ऋणानुबंध संपला.

घरांतली मांजर तीं काय आणि त्यांच्यावर तीं न आवडणाऱ्या माझ्यासारख्यानें असें शोकगीत लिहिलेले पाहून वाचक हंसायला लागतील. पण हीच तर मानवी मनाची शोकांतिका आहे. त्याला ज्या गोष्टी आवडत नाहींत त्या तो अपरिहार्य म्हणून पत्करतो अन् मग त्या नष्ट झाल्या तर सुटकेचा निःश्वास सोडण्याऐवजीं – किंवा निःश्वास सोडीत असतांनाहि – त्याला कळतं कीं सहवासान त्याहि आपल्याला आवडूं लागल्या होत्या. लहानपणीं आमच्या वडिलांचे एक स्नेही मला नेहमीं म्हणत, ‘ अरे, तापटपणा उपयोगी नाहीं. You must have tolerance. जगांत सुखी व्हायचं असलं तर सोशिकपणा अंगीं बाणवला पाहिजे. ’ त्या वेळीं तें बोलणं समजलं नव्हतं. पण चिमीच्या अन् बंड्याच्या वास्तव्यानं तें पदोपदीं वळूं लागलं होतं. सगळं मनासारखं जमत नाहीं, अनेक वेळां मन बंड करून उठतं. पण शेवटीं आपण आपल्या स्वभावधर्माचे दास होतों. तो बदलणें अवघड. आणि स्वभाव न ओळखतां जर तात्त्विक मुद्द्यावर अटीतटीला आलो तर तें एक तर टिकत नाही किंवा टिकलंच तरी सुखाचं होत नाहीं उलट मनस्ताप वाढतो.

चिमीनं उंदीर माझ्यासमोर खातां कामा नये, चिमण्या मारतां कामा नयेत, तिन कृतज्ञता थोडी तरी दाखवायला हवी, तिची पिलं संभाळलीं गेलीं पाहिजेत, तीं वेळच्या वेळीं लोकांनीं नेली

पाहिजेत अशा माझ्या कितीतरी अटी होत्या. पण माझ्यासाठीं मांजर कांहीं आपला स्वभाव बदलणार नाहीं. उलट ज्यांना मांजर आवडतं त्यांना तें त्याच्या स्वभावासकट आवडतं; त्यांतून त्यांच्या दुसऱ्या एखाद्या छंदाच्या आड तें आल तर त्यांची त्यालाहि हांकलायची तयारी असते. मला मांजराचा स्वभाव बदलतां येत नाहीं; तें मनापासून आवडत नाही, पण जवळच्या माणसांना दुखवतां येत नाहीं म्हणून मी ते पत्करतों; स्वभावधर्मानुसार त्याला संरक्षण देतों; कांहीं बाबतींत मग ते मला आवडायला लागतं आणि नंतर मी असा हळहळतोहि! तेव्हां 'तुझ्या सुखदुःखाला तुझा स्वभाव म्हणजे तुझा तूंच कारण आहेस' हें तत्त्वज्ञान मला चिमीनं शिकविलं. लहानपणीं 'चिमा काय कामाची' हें वाक्य उलटसुलट सारखंच म्हणून माहीत झालं होतं. आतां चिमी काय कामाची हें अनुभवान कळलं.

आतां घरांत मांजर नसल्यानं देवघराच्या खिडकींतून चिमण्या बिनधोकपणें आंत येतात, बागडतात, पुनः उडून जातात. त्यांच्याकडे पाहत बसायला मला फार आवडतं. पुन्हा घरांत माजर आणायचं नाहीं – गवळ्याकडं दिलेलं एखादं पिल्लूसुद्धां – हें माझं नक्की ठरलंय्; पण पुन्हा जर बंड्या चुकून परत आला तर घरांत सगळ्यांना अत्यानंद होईल. त्याला ठेवून घ्यायला मलाहि नाहीं म्हणवणार नाहीं. पण तो आलाच तर त्यानं चिमण्या न मारण्याइतकं शहाणं होऊन याव एवढीच मी इच्छा करीन.

वाङ्मय शोभा,
दीपावलि, १९६१





९

# भिकारी

एकेक दिवस मोठा मजेचा जातो.

जीवन हें सुख आणि दुःख यांच्या धाग्यांनीं विणलेलें वस्त्र आहे असें तत्त्वज्ञ म्हणत असले तरी एकेका दिवसापुरता अगर कांहीं प्रहरांपुरता विचार केला तर तो सुखाचा गेला असं म्हणायला कांहीं हरकत नसते. फार तर तो सुखाचा धागा अल्पकाल हातीं लागला असं म्हणावं, वाटलं तर !

तसं म्हणाल तर माझ्या सुखाच्या कल्पना अनेक आहेत आणि त्यांतल्या कांही अगदीं साध्या आहेत. इतक्या साध्या गोष्टींत सुख सामावलेलं असलं तर असं सुख वारंवार मिळायला हरकत नसावी असंहि कुणी म्हणेल. पण निदान माझ्या तरी बाबतींत असं घडत नाहीं खरें ! एखादे दिवशीं सगळें मनासारखें जमून येतें पण कुठल्या तरी एखाद्या बारक्या गोष्टीनें माझ्या आनंदाला विरजण लागतें. असं कां व्हावं

तें मला सांगतां येत नाहीं. एखादा बेत योजून एखाद्या मित्राकडे जावें आणि तो भेटूं नये, तो भेटला तरी त्याला बरें नसावें अगर कांहीं काम असावें किंबहुना आपण ज्या उत्साहानें त्याला भेटायला आलो त्याला प्रतिसाद देण्याइतका उत्साह त्या दिवशीं त्याच्याठायीं नाही असा मनाला अंधुक संशय यावा, इतकें देखील कारण माझ्या मनाचा विरस करायला मला पुरेसें होतें. पण त्या दिवशीं असें कांहीहि घडलें नाही. दिवस उगवला तोच मुळीं हंसत-मुखानें. ताज्या दुधाचा चहा वेळेवर मिळण्यापासून सुरुवातहि चांगली झाली. कुणी मला हंसूं नका बरें का! कारण मी मुंबईत आलों कीं असें अनेकदां घडलेलें आहे. रोज नियमानें लवकर येणारा गवळी त्या दिवशीं नेमका उशिरां येतो. मी साडेपांचपासून जागा होऊन वहिनी चहाला केव्हां हांक मारतात याची वाट पहात असतो. त्याहि जाग्या असतात पण शिळ्या दुधानें भावजींची शान बिघडते हें त्यांना माहीत असल्यानें त्या स्वस्थ डोळे मिटून पडलेल्या असतात. आणि एकदां सकाळच्या चहानें अपशकून केला कीं मला पण सारखे वाटायला लागतें कीं आज चद्र खास बिघडला असला पाहिजे, शनीच्या दृष्टीत नाही तर युतीत असला पाहिजे.

पण सांगत काय होतों तर त्या दिवशी तसें कांहींहि घडलें नाहीं. रात्रीची शाल दूर करून उषेनें हंसतमुखानें दर्शन दिलें तोंवर माझा चहासुद्धां झाला. मी माझे आन्हिक आंवरलें आणि माझा मित्र सदाशिव याच्या घरीं गेलो. आमचा सदाशिव नांवाप्रमाणेंच कल्याणकारी असला तरी तो कवि असल्यानें त्याचें मूड्स (Moods) कां काय म्हणतात ते नेहमींच ठिकाणावर नसतात. पण सुदैवानें त्या दिवशीं कुठल्याहि साहित्यसमस्येनें त्याच्या मूड्स बिथरवल्या नव्हत्या किंवा कुठल्याहि जागतिक प्रश्नानें त्याचें मन चाळवलें गेलें नव्हतें. माझे दोन्ही हात

हातांत घेऊन त्यानें जेव्हां माझें स्वागत केलें तेव्हाच मीं ओळखलें कीं स्वारी आज खुषींत आहे. मला पाहिल्याबरोबर तो म्हणाला, 'दोस्त, आज मी अगदीं मोकळा आहे. आज मला कामावरसुद्धा जायचें नाही. आपण खूप भटकूं या.'

मला तरी त्याहून आनंदाची अशी गोष्ट त्या वेळीं कोणती होती. माझ्याहि डोक्यावर 'अगदीं आतांच केलें पाहिजे' असें कुठलेंहि जबाबदारीचें असें काम नव्हतें. दिवसाची सुरुवातहि छान झाली होती. आणि ज्याच्याकडे प्रथम आलों त्या दोस्तालाहि माझा सहवास तितक्याच उत्कटतेनें हवा होता. सुदैवानें पुरेशी चिल्लरहि खिशात होती. म्हणजे त्या बाजूनेंहि नाट लागणार नव्हता. नाही तर नेमके मजजवळ पैसे नसायचे आणि आमचे दिलदार सदुभाऊहि त्या वेळीं महिनाअखेर म्हणून कडकींत असायचे. तसें पाहिलें तर आम्हीं चैन चैन म्हणजे तरी काय करणार होतो? फोर्टमधल्या सगळ्या लहानमोठ्या, आडव्याउभ्या रस्त्यांनीं मनसोक्त भटकणार होतों, चार सस्ती पुस्तकें आणि कांही रंगीत इंग्रजी रद्दी घेणार होतों, लहर लागेल त्या वेळीं एकाद्या हाटेलांत शिरून चहा नाहीतर सरबत घेणार होतों, चार दोन मस्त सिगारेट्स फुंकणार होतों, फारफार तर एखादा सिनेमा पहाणार होतों, रेक्लमेशनवर जाऊन समुद्राचें संगीत ऐकत भेळ नाहींतर नारियेल खाणार होतों आणि मुख्य म्हणजे हें सगळें करीत असतां मनसोक्त गप्पा मारणार होतों. गप्पा मारण्यासारखें व्यसन नाही असें अनेक विद्वानांनीं सांगितलें आहे आणि तें मला अमान्य आहे असेंहि नाहीं; पण या विद्वान् चोरानीं सगळ्या मोठ्या लोकांच्या बाटलीच्या लायसेन्सप्रमाणें **काव्यशास्त्र विनोदेन कालो गच्छति धीमताम्** असें म्हणून स्वतःपुरता गप्पांचा लायसेन्सहि काढलेला आहे. मी विद्वान् नसलों तरी विद्वत्तेची उंची आणि खोली, लांबी आणि रुंदी मोजण्याचा टेप

मजजवळ आहे. तेव्हां मी काय त्यांच्या अधिकाराला जुमानतो ! गप्पा मारून मन रिझवायचा ( दिल बहलानेका ) माझा अधिकार मला मनासारखा सोबती मिळतो तेव्हां मी बजावतोंच.

असाच तो सारा दिवस मी सदूच्या गहिऱ्या संगतींत घालवला. आम्हीं भटकलो. पिक्चर बघितलें. गप्पा केल्या. सदाशिव तसा मोठा जाणता आणि रसिक आहे. किंचित्काव्यापासून नवकाव्यापर्यंत, महात्मायनापासून कृष्णजींच्या प्रवचनापर्यंत तो हिरीरीनें बोलत होता, माझ्याशीं वाद घालीत होता, मला कांहीं गोष्टी समजत नाहीत असें म्हणत होता, ज्या बाबतींत त्याचें माझें पटेल त्या बाबतींत माझ्या बुद्धीची समजून घेण्याची कुवत मान्य करीत होता. मीहि कांहीं वेळां मनापासून तर कांहीं वेळां त्याला मुद्दाम डिवचून बोलता ठेवण्यासाठीं वेगवेगळे मुद्दे मांडीत होतो. बोलतां बोलतां मॉमच्या **ऑफ ह्यूमन बाँडेजवर** तो बोलूं लागला. मनाची शक्ति किती विलक्षण असते याचे अनुभव देणारे महात्मे आणि योगी आपण केव्हा ना केव्हां पाहिलेले असतात, वेड्यांच्या विकृतीहि आपल्याला अपरिचित नसतात, पण मनुष्य जन्माला येतांना मनाभोंवती जे सूक्ष्म पाश घेऊन येतो आणि नतर त्याच्या बालवयांत त्याच्यावर जे संस्कार घडतात त्यामुळे पुढच्या आयुष्यांत तो कसा बांधला जातो, याचें मॉमनें रंगवलेलें चित्र तो वर्णन करून सांगूं लागला. येवढ्यांत एक भिकारी समोर येऊन तोंड वेंगाडून भीक मागूं लागला. आमच्या बोलण्यांत व्यत्यय नको म्हणून मी खिशांत हात घालून पैसा काढूं लागलों. तेव्हां मला अडवून सदू म्हणाला, ' हें बघ, या लोकांचा भीक मागणें हाच धंदा असतो. या लोकांना आपण अजिबात उत्तेजन देतां कामा नये. ' तेवढ्यांत त्या भिकाऱ्याला मीं पैसा देऊन टाकलेला असल्यामुळें तो वाटेला लागला खरा पण त्याला भिक्षा मिळाली हें पाहून दुसरी एक भिकारीण एक रोगे रडकें पोर घेऊन पुढें आली. तेव्हां सदू म्हणाला,

हें पाहिलंस, हं असं होतं. हें घातचक्र कधींच सपणार नाहीं. आमच्या देशांतील भिकाऱ्यांचा प्रश्न सरकारनेंच सोडवला पाहिजे. ही आपल्या समाजाला लागलेली कीड आहे. आपण सुशिक्षितांनीं तरी त्यांना भीक घालतां कामा नये.'

'खरं आहे तुझं म्हणणं, सदू. पण तुला सांगू कां कांहीं वेळां त्यांचा तो दीनवाणेपणा—कदाचित् तो खोटाहि असेल—मला सहन होत नाही. माझा मनःस्ताप टाळण्यासाटीं मी ते पैसे देतों. मला वाटतं आपण आतां उठूंच या. भिकारी आपल्याला सोडणार नसले तरी आपण त्यांना सोडून दूर जाऊं या.' तरी सुद्धां जातां जातां मी माझ्या हातांतला नारळ त्या भिकारणीच्या मुलाच्या हातांत दिलाच. तेव्हां सदू मला म्हणाला, 'पाहिलस, हा तुझा दुबळेपणा आहे. तुला माहीत नाहीं ही मुलंसुद्धां यांनीं उसनीं आणलेलीं असतात. तुमच्या मनांत दया उत्पन्न कराय-पुरताच त्यांचा उपयोग!'

'तुझं म्हणणं मला पटतं, सदू. पण खरं सागूं का, लहान पोर म्हटल कीं माझ्या पोटात कालवतंच. उद्यां आपलं सरकार जर त्यांची काळजी घेईल तर मी कांहीं भिकारी किंवा भिकाऱ्याचीं मुल शोधायला जाणार नाहीं.'

'आम्ही दोघेहि तेथून उठलो आणि बसनें परत दादरला आलों. आतां चांगलीच रात्र झाली होती. तरी पण एकमेकांची संगत संपवायची दोघांचीहि इच्छा नव्हती. तेव्हा मला दादर मारुतीपर्यंत पोचवून सदूनें लोकलनें घरीं परत जावें असें ठरवून आम्ही दोघेहि घरंगळत टिळक पुलावरून निघालो. आतां आम्ही आमच्या दिवसभराच्या भटकंतीचा आढावा घेत होतो. तेव्हां सदू म्हणाला, 'काय रे, आज तुला किती पैशाला चाट बसली? मीं तर अगदीं कफल्लकच होतों आज!'

' जाऊं दे रे ! आज वेळ इतका मजेत गेला आहे कीं त्याला आता हिशेबाचें गालबोट लावूं नकोस. कांहीं वेळां असं घडतं कीं मागे तुझ्यावर प्रेम करायचं ठरवून मी येतों आणि तुझा दुसऱ्याच कोणाशीं संकेत ठरलेला असतो. आज किती तरी दिवसांनी आपण इतका वेळ मजेत घालवला. किती तरी विषयांची चिरफाड केली, किती तरी बिड्या प्याल्यो. आतां हवा कशाला तो हिशेब ? '

' तसं नव्हे रे ' सदू म्हणाला ' माझ्या खिशांत फक्त बारा आणे आहेत. तर आपण आतां ' पुरोहिता 'पाशी आलोच आहोंत तर मीच तुला मसाला दूध पाजतों, मग एक मसाला पट्टी आणि नंतर पुन्हा एक एक सिगरेट आणि मग मी अबाउट टर्न ' करून स्टेशनाकडे जाईन; तूंहि घरीं जा. '

ती कल्पना मलाहि अर्थातच आवडली. आम्ही ती पारहि पाडली. मला मारुतीपाशीं ' अच्छा, चीरिओ ' करून सदू डाव्या हाताला स्टेशनकडे वळला आणि मी फूटपाथ सोडून भवानीशंकर रोडला लागणार इतक्यांत माझ्याच नादांत माझा कुणावर तरी पाय पडणार होता असें माझ्या लक्षांत आलें. म्हणून मी जरा दचकून मागें सरलों. माझ्या पायाशीं एक आठनऊ वर्षांचा मुलगा एका हाताच्या ढंडावर डोकं टेकून शांतपणें निजला होता. अजून फारशी रात्र झाली नसली तरी या बाजूला या वेळीं शुकशुकाटच असतो. एखादी मोटार किंवा बस जाते तिचा होईल तो आवाज किंवा पानाच्या दुकानाशीं शौकीन लोक उभे असतात, त्यांची काय असेल ती जाग. पण तीसुद्धां शुकशुकाटाची जाणीव करून देणारीच असते. सदूच्या सहवासांत दहा-बारा तासांहून अधिक वेळ काढून मी नुकताच ' एकटा ' झालों होतों. अजून माझें मन त्या दिवसाच्या धुंदींतच होतें. पण कां कोणास ठाऊक तो

निजलेला मुलगा पाहून मला माझ्या घराची आणि मुलांची आठवण झाली. तो मुलगा काळा होता, वस्त्रहीन होता, झोप-ल्यामुळें त्याचे डोळेहि मिटलेले होते; तरी पण त्याच्या मुखा-वर मला एक विलक्षण आर्तता प्रतीत झाली. कदाचित् तो भासहि असेल; ढगांचे आकार पाहून होतो तसा. पण तसं झालें खरें. माझ्या मनांत आलें, माझीं मुलें पुण्याला घरीं आरामांत निजली असतील, त्यांच्या अंगावरचीं पांघरुणं नीट करायला त्यांच्याजवळ त्यांची आईसुद्धां आहे. तीं खेळून आणि जेवून निजलीं असतील. हा बोलून चालून भिकाऱ्याचा मुलगा—पण हें आपण म्हणणंहि चूकच आहे; त्याला 'आपला' म्हणणारे भिकारी आईबाप तरी आहेत कीं नाहींत कुणास ठाऊक — हा भीकहि मागत नाहीं, किंवा आपल्याकडे दीनवाणें बघतहि नाहीं असें असतांना त्याला बघून आपलें सुखाच्या तंद्रींत असलेले मन कां चाळवलें जावें बरें ? पण असल्या विचारांचा ताण माझ्या मनाला आतां सहन होणार नव्हता. वादासाठी वाद आम्ही दुपारीं पुष्कळ केला होता. पण तोहि सुख मिळवण्याचा एक भाग होता म्हणूनच. आणि आतांहि मला दुःख नको होतें. हातीं लागलेला सुखाचा धागा असा एकाएकीं तुटावा हे मला नको होते. मी त्या मुलाकडे फिरून एकवार निरखून पाहिलें. माझ्या मनात आलें आपण सर्वच कसले न् कसलें दुःख आपल्या आयुष्यात भोगतोंच. पण मुलांच्यावर तीं लहान असतांना तरी कसलें दुःख भोगायची वेळ येऊं नये आणि असं या मुलाबद्दल वाटायला त्याला कुणी नसावं हीच खरोखर एक मोठी दुःखांतिका आहे. अभावितपणें माझा हात खिशांत गेला आणि हाताला लागली ती चिल्लर काढून मी ती त्या मुलाच्या उघड्या असलेल्या

हातांत टाकली आणि मनांत 'माझ्या' मुलांच्याबद्दल परमेश्वराची प्रार्थना करीत मी रस्ता चालू लागलो. भिकाऱ्यांना उत्तेजन देऊं नये, भीक घालणं हा गुन्हा ठरला पाहिजे वगैरे सदूनें सद्-भावनेनें प्रतिपादन केलेले आणि मला पटलेले सिद्धांत मी पार विसरून गेलों होतो. 'भिकारी आपणाला सोडत नाहींत तर आपण त्यांना सोडून जाऊं' असें म्हणून निघालेला मी, एका भीक न मागणाऱ्या आणि झोंपी गेलेल्या भिकाऱ्याच्या मुलाला पाहून पोळलों होतों; त्या चटक्यावर फुंकर घालण्याकरितां त्यानं न मागितलेली भीक त्याच्या हातावर टाकून चाललों होतों; आणि ज्याच्या अस्तित्वाबद्दल मन अनेकदां साशंक बनतें अशा देवाजवळ माझ्या मुलांच्या सुखाची भीक मागत होतो. खरोखर भिकारी तो नव्हता, भिकारी मी होतों.

वाङ्मय शोभा
एप्रिल, १९५५





१०

# तें माझें घर

मुंबईस रात्रीं १० वाजतां नागपूर एक्सप्रेसला बसलो कीं उजाडतां ६ वाजतां आपण जळगांवला पोंचतों. हा प्रवासच नव्हे तर एकंदरींत सगळाच प्रवास कांहीं लोकांना मोठा सुखाचा वाटतो. त्याकरितां त्यांना सेकंडचं तिकिट काढावं लागत नाहीं. फर्स्टचं काढावं लागत नाहीं. अगदीं रॉयल क्लासांत वरच्या फळीवर उशाशीं कोट आणि अंगावर चादर एवढा सरंजाम असला कीं लागली त्यांची तंद्री. अगदीं युद्धकाळांत सुद्धां हमालाला चारदोन आणे जास्त देऊन, गाडी यार्डांत असतांनाच खिडकींतून आंत प्रवेश मिळवायचा आणि द्यायची ताणून. मग गाडी प्लॅटफॉर्मला लागल्यावर बाहेर युद्ध होवो नाहीं तर क्रांति होतो !

अशा सुखी लोकांत माझी गणना करतां येणार नाहीं. कारण रॉयल क्लासच्याऐवजीं वरच्या वर्गाचं जरी तिकिट काढलं तरी अशी झोंप मला कुठल्याच प्रवासांत लागत नाहीं आणि

जळगांवास जातांना तर नाहींच नाहीं. जळगांवला जाणारी गाडी हालली रे हालली कीं माझ्या मनालाहि कसलं तरी स्फुरण चढतं आणि केव्हां आठवणींच्या वारूवर बसून गतकाळांतून आणि केव्हां कल्पनेच्या वारूवर बसून भविष्यकाळांतून माझं मन भराऱ्या मारूं लागतं आणि तें किती भूमि पादाक्रांत करील याचा तर मुळीं हिशेबच नाहीं. बाकावर जागा नसली तर मी दोन बाकांच्या मधे पथारी टाकून पडतों आणि तसं पडलं म्हणजे चाकांचं खडम् खडम् असं लयबद्ध संगीत अगदीं जवळून ऐकायला सांपडतं. तें संगीत ऐकतां ऐकतां जी गोड गुंगी लागते तिची सर घरीं येणाऱ्या झोंपेला कुठली यायला !

गाडी मधल्या स्टेशनांवर थांबली कीं ती तंद्री भंग पावते, पण पुन्हा चालूं लागली आणि ते संगीत पुन्हा सुरू झालें कीं ती गोड गुंगी आपल्या मायेनें मला पुन्हा भारून टाकते. या गुंगींत घरचीं किती विलक्षण स्वप्नं पडत असतात. स्थलकालाची गल्लत होऊन कांहीं वेगळंच विश्व डोळ्यांपुढें उभं रहातं आणि कॅलेडेस्कोप हालवला म्हणजे लहान आकृत्या बदलतात तसं तें विश्वहि वेग-वेगळीं रूपं धारण करीत असतं ! पण पहांटे गाडी चाळीसगांव स्टेशनांत शिरली रे शिरली कीं ही स्वप्नमय झोंप संपून जागेपणचीं स्वप्नं सुरू होतात. चाळीसगांव हें दोन्ही खानदेशांचें प्रवेशद्वार. एका बाजूस पूर्व खानदेशाचें केंद्र जळगांव व दुसऱ्या बाजूस पश्चिम खानदेशाची राजधानी धुळें. याच परिसरांत माझ्या वडिलांनी नोकरीचीं चाळीस वर्षें काढली आणि गेली दहा वर्षें ते जळगांवांत स्थायिक होऊन विसांवा घेत आहेत. जळगांव, येथून अवघें साट मैल आहे आणि अवघ्या दीड तासांत मी जळगांवला पोंचणार आहे. या चाळीसगांवांत मीं गेली कित्येक वर्षें मुक्कामहि केलेला नाहीं; पण इथं गाडी पोंचली कीं किती रम्य आठवणी माझ्यापुढें

हंसतमुखानं उभ्या राहतात.

आईला सोडून आणि एकट्या अप्पासाहेबांच्या सहवासांत लहानपणीं घालवलेले दिवस म्हणजे फिरतीचे. शाळांना सुट्या झाल्या कीं कधीं मी व बाबा, कधीं मी व कुसुम असे आप्पा-साहेबांबरोबर फिरतीवर जात असूं. या चाळीसगांवांत मी आणि बाबा त्यांच्याबरोबर एकदां आलों होतों. त्या वेळीं पस्तीस चाळीसच्या घरांत असणारे आणि फेटा बांधणारे * गोखले तात्या त्या वेळीं आप्पासाहेबांना भेटायला म्हणून येऊन एक दिवस राहून गेलेले मला आठवतात. ते त्या वेळीं सिंधमध्यें एक्झिक्यूटिव्ह इंजि-नीयर होते आणि मुंबईस आले म्हणजे माझ्या आई-वडिलांना भेटायला येऊन जात. अप्पासाहेब त्यांना 'अरे तात्या' म्हणत. तात्या त्यांना वांकून नमस्कार करीत आणि आईला आई-साहेब म्हणत याची मला मोठी गंमत वाटे. एवढे मोठे तात्या गोखले, अप्पासाहेबांना एवढे मानतात तेव्हां आप्पासाहेब फार मोठे असले पाहिजेत एवढेंच वाटे; पण त्यांतील भावना आणि आप्पासाहेबांचा खरा मोठेपणा त्या वेळीं मला समजला नव्हता.

याच चाळीसगांवाजवळ धुळ्याच्या वाटेवर जामदं म्हणून गांव आहे. तिथल्या रहदारी बंगल्यांत आम्ही सगळीं माणसें एका मे महिन्यांत राहिलों होतो. धुळ्याला जातांना जामद्याजवळचा नदी-वरचा पूल ओलांडला कीं तो बंगला अजून दिसतो. त्या पुला-वरून गाडी चालली कीं नदींत एक पैसा टाकायचा आणि त्या बंगल्याकडे पाहून नमस्कार करायचा ही माझी लहानपणची भोळी-भाबडी संवय आजहि कायम आहे हें परवां मी धुळ्याहून

---

* गंगाधर नीळकंठ गोखले. कांहीं वर्षांपूर्वी कराचीं इंजिनीयरिंग कॉलेजचे प्रिन्सिपॉल होते. सुप्रसिद्ध थिऑसोफिस्ट.

आलो तेव्हां माझ्या लक्षांत आलें. धुळयाला आम्ही १७ वर्षं होतों त्या वेळची ही संवय. नंतर १० वर्षांनीं पण कायम राहिली आहे. या जामद्याच्या बंगल्यांतला तो पालथा डोंगा, ती पाऊलवाटेवरची झाडी — याच ठिकाणीं रोज सकाळीं बसून आमच्या आईनं तिचं एक नाटक संपूर्ण लिहून काढलं — बंगल्याभोंवतालचीं तीं आंब्याचीं झाडं; सारं कसं गतवर्षीच तिकडे जाऊन आल्या-प्रमाणें मला आठवतं. बंगल्यांतच सकाळीं-दुपारीं कचेरीचें काम चाले. ते कैदी, ते पोलीस, ते पहारेकरी, तो दरारा, ती आदब सगळं अजून जसंच्या तसं आठवतं! त्या डोंग्यावर बसून मी आगगाडी खेळत होतो, झाडांचे आंबे खात होतो, नदीवर जात होतों. रात्रीं उघड्यावर खाटा टाकून पडलं म्हणजे झाडांच्या फांद्या आणि त्यांच्या विचित्र सांवल्या पाहून गंमतहि वाटे आणि भीतीहि वाटे.

चाळीसगांवानतर लागतात माहिजी आणि पाचोरा. पाचोऱ्याच्या बंगल्यांत आमच्या शेजारी रहाणारी आणि खूप गोड बोलणारी ती मिशनरी बाई आणि घरीं केलेले उत्तम चॉकोलेट देणारा तो पारशी अबकारी साहेब. त्या बाईचा मनमोकळेपणा खूप आवडा-यचा; पण तिनें तिच्या घरीं रहायला बोलावलं कीं बाटण्याची भीति वाटायची. त्या पारशाकडे चॉकोलेट खाऊन पाणी पितांना घरीं आईच्या राज्यांत गड्याच्या हातचं पाणीहि चालत नाहीं याची आठवण होऊन 'आईला कळलं तर?' असं वाटायचं; पण आमचे अप्पासाहेब जरी जुन्या वळणाचे असले तरी अशा बाबतींत ते बरेच उदारमतवादी होते. आईच्या जुन्या समजुती आईनें नेहमींच कट्टरपणानें सभाळल्या आहेत. लेखिका, व्याख्याती, पहिली स्त्री-नाटककार म्हणून सार्वजनिक जीवनांत तिनें खूप भाग घेतला; पण तेव्हांहि तिनें आपल्या पुराणमतवादी

समजुती सोडल्या नाहींत. मग संबंध राजेरजवाड्यांशीं येवो अगर वरिष्ठ युरोपियन वा पारशी अधिकाऱ्यांशीं येवो. आणि अप्पासाहेबांनींहि तिच्यावर कांहीं लादलें नाहीं. म्हणजे असेहि ते उदारमतवादीच होते; पण स्वतः मात्र कालमानाप्रमाणें त्यांनीं रूढींचा खळखळ न करतां त्याग केला. त्यामुळें अप्पासाहेबांच्या सहवासांत पाव, केक्स, चॉकोलेट वगैरे वस्तु आणि त्या कुणाकडेही खाणं म्हणजे त्या वयांत आम्हांला अपूर्वाईच वाटे. मला वाटतं, माझी चॉकोलेट-भक्ति त्या पारशाच्या वरदहस्तामुळेंच उत्पन्न झाली असावी.

माहिजीची जत्रा पहायला आम्ही पाचोऱ्याहून गेलों. तेथें नवी नवलाई म्हणून दोन स्प्रिंगच्या मोटारी घेतल्या आणि पाचोऱ्याला बंगल्यांत परत आल्यावर मी व ताईनें — त्या वेळीं मी आणि कुसुमताई अशी जोडी फिरतीवर आलों होतों — लढाई खेळायची ठरविलें आणि समोरासमोर बसून त्या मोटारी एकमेकीवर सोडल्या. त्या चकमकींत ताईची मोटार मोडली. कुसुमताई आणि मी आज किती तरी मोठीं झालों आहोंत, दोघांच्याहि आयुष्यांत किती तरी स्थित्यंतरं झाली आहेत; पण माहिजीहून मालगाडीच्या गार्डाच्या डब्यांतून माझ्याबरोबर खिदळत पाचोऱ्याला आलेली ताई, मोटार मोडल्यानंतर भोकाड पसरणारी ताई आणि अमळनेरच्या बंगल्यांत कोसळणाऱ्या पावसांत केस मोकळे सोडून आउटहाउसमधून बंगल्यांत आणि बंगल्यांतून आउटहौसकडे माझ्याबरोबर धांवणारी ताई मला चांगली आठवते, प्रिय वाटते आणि त्या क्षणींचा ' नाना ' तिलाहि अजून फार आवडतो. त्या वेळच्या गोष्टी निघाल्या म्हणजे अजूनहि ती किती खुलते !

अशाच एका मुक्कामांत उकडहंडीची चव मीं चाखली होती. गांवचे लोक अनेक वेळां ग्रामीण मेवा आणून देत. त्या काळीं

मामलेदार किंवा प्रांत म्हणजे राजा असे. खानदेशसारखा संपन्न प्रांत, सुबत्तेचे दिवस आणि अप्पासाहेबांसारखा न्यायी आणि स्वच्छ अधिकारी. पाटील लोक म्हणत, 'साहेब, हीं आमच्या घरचीं फळं आणि भाजी तरी नाकारूं नका!' असा मेवा आला म्हणजे उकडहंडी निघायची. ओला हरभरा, तुरीच्या शेंगा, रताळीं, हिरव्या मिरच्या आणि मीठ असे जिन्नस एका मडक्यांत घालून, केळीच्या पानाचा दादरा बांधून, त्यावर शेणमाती थापीत. एक लहानसा खड्डा खणून त्यांत तें मडकें तोंडाकडून पुरत आणि वर शेकोटी पेटवीत. अर्ध्या तासांत हंडी उकडून निघे. ती कागदावर पालथी करीत. त्या मेव्याची लज्जत खरोखर अपूर्व असे!

इथेंच जवळपास नेरी गांव आहे. इथल्या मुक्कामांत तंबूच्या मागच्या बाजूनें भोंक पाडून चोर आंत शिरले. पहांटे संवयीनें पाणी पिण्याकरितां अप्पासाहेब जागे झाले. पण पलंगाखालीं कोणी तरी खडबड करीत आहे आणि डोक्याशींहि कोणी तरी आहे अशी त्यांना चाहूल लागली. क्षणांत मनाचा निश्चय करून कुशी बदलून पुन्हा झोंपीं गेल्याप्रमाणे ते पडून राहिले. चोर-ट्यांना तेवढी सूचना पुरली असावी. मिळाला तो माल घेऊन ते पळून गेले. नंतर अप्पासाहेबांनीं शिपायाला हांक मारली. सगळे गोळा होईपर्यंत आपणच निर्माण केलेल्या रस्त्यानें चोरटे पळून गेले होते. पण एकंदरींत सोन्याचीं बटणें असलेला शर्ट आणि कपडे येवढ्यावरच निभावलें होतें. कपड्याच्या पेटी-मागें खजिन्याची पेटी होती. पण तिला हात लागला नव्हता. या सगळ्यांत सुदैवाची खैर म्हणजे एक मोठें संकट टळलें होतें. आप्पासाहेबांच्या डोक्याशीं एक मोठा धोंडा सांपडला. जर त्यांनीं एकदम उठून हालचाल केली असती तर त्यांचा समाचार घ्यायला

म्हणून डोक्याशीं बसलेल्या चोरानें हातांत तो धोंडा ठेवला असावा ! त्यांच्या प्रसंगावधानानेंच ते त्यावेळीं बचावले.

पहातां पहातां चाळीसगांव मागं पडतं. माहिजी, पाचोरें सोडून गाडी पुढें निघते आणि गिरणेचा पूल गेला कीं जळगांवच्या गिरणीचे भोंगे दिसूं लागतात. तें पहा आलंच जळगांव ! जळगांव माझं जन्मग्राम. जिथें माझं घर आहे, ज्या घरांत आई आहे, कमा आहे, अप्पासाहेब आहेत, ज्या घरांत कुठल्याहि सुख-दुःखाच्या प्रसंगाला आत्याबाई हमखास असतात, तें माझं घर ज्या जळगांवांत आहे तें जळगांव आलं ! गाडी स्टेशनांत शिरते, मी सामान घेऊन अधीरतेनें उभा राहतों आणि गाडी थांबण्याची वाट पाहूं लागतों. 'भात शिजेपर्यंत दम निघतो; पण वाफ जिरेपर्यंत दम निघत नाहीं' असं म्हणतात तें अगदीं खरं ! गाडी थांबते, मी उतरतों. गरम चहा प्यायचा मोह होतो; पण छे ! इथें त्याकरतां थांबलों तर घरीं पोंचायला उशीर होईल ! मी तसाच घराच्या वाटेला लागतों. पांच-सात मिनिटांतच घराच्या वळणावरचा मारुति दिसूं लागतो. किती तरी शनिवारीं आणि जन्मोत्सव-दिवशीं मीं इथें प्रसाद खाल्लेला आहे. मी त्याला चालतां चालतां नमस्कार करतों आणि मनोमन घरची खबर विचारतों. तो कधींच बोलत नाहीं. मलाहि उत्तराची अपेक्षा नसते. मी तसाच पुढें होतों. फाटकांत शिरतों तों हमालानें सामान ओट्यावर नेऊन ठेवलेलेंसुद्धां दिसतें. मी घंटा वाजवून हांक मारतों 'आई !' मला वाटतं, आई दार उघडील; पण घरीं आलेला कुणी तरी मेंबर—अक्का, अक्काची एकादी मुलगी, एकादी बहीण नाहीं तर वहिनी—पुढें येऊन दार उघडते. मला नेहमीं वाटतं कीं, आईकडून कोड-कौतुक करून घ्यायला मी एकटाच घरीं आलेला असेन; पण तसं कधींच घडत नाहीं. आप्पासाहेबांच्या एवढ्या परिवारांतला कुणी तरी वांटेकरी

त्यांत असतोच.

एका दिवाळीला तर आम्ही घरचीं मुलं आणि नातवंडं मिळून ३५ जण होतों आणि आप्पासाहेबांच्या ८० व्या वाढदिवशीं तर आप्त-मित्र धरून सुमारें ७५-८० जण होतों आणि अशा वेळीं मात्र एवढं मोठं आमचं घरहि अपुरं पडतं!

हें घर माझ्या जन्माच्या वेळीं बांधलं. त्या वेळीं जळगांवची वस्ती १५-२० हजार असेल; आज ती पाऊण लाख आहे. त्या वेळीं घर अगदीं गांवाबाहेर होतं. आतां तें भर गांवांत आल्यासारखं वाटतं. पुढंमागं ऐस-पैस जागा. पुढें ओटा, मागें चौक. पुढें बाग, मागें विहीर. बागेची निगा आतां नीट रहात नाहीं. वडील वृद्ध, कमा अपंग; एकटी आई नोकराच्या मदतीनें झालं तरी किती करणार! मला आठवतं कीं, लहानपणीं या पुढच्या बागेंत दोन मांडव होते; त्यांवर सायलीचे वेल होते. बागेत पोपई होत्या, लिंबाचं झाड होतं, आवळी होती, पावसाळ्यांत फुलांनीं डंवरणारा पारिजात होता; निशिगंध, मोगरा, गुलाब, तुळस, सब्जा यांचीं झाडं तर किती तरी होतीं. मागच्या परसांतली विहीर मात्र अजून आहे तशीच आहे. बोरीचं झाड, तुतीचं झाड हीं अजूनहि आहेत. हल्लीं आंब्याचं झाड पण आहे. पूर्वीसारखे भाजीपाल्याचे वाफे मात्र आतां नाहींत.

पण अजूनहि त्या घरांत शिरतांना तोच आनंद होतो. कारण आमचें सर्वांचें असें घर तेंच आहे. आतां आम्हीं सर्व पांगलों आहोंत. कुणीं घर बांधलें आहे. कुणाला चांगलें घर मिळालें आहे, कुणी अजून एका जागीं स्थिर नसल्यानें घर बांधण्याचा प्रश्नच त्याच्या बाबतींत उद्भवलेला नाहीं; पण सर्वांना जर विचारलं कीं, तुमचं घर कुठें आहे? तर सर्वांचें उत्तर मात्र एकच मिळेल आणि तें हेंच कीं, आमचं घर जळगांवला आहे! हें उत्तर आम्ही मुलगेच देऊं असं

नाहीं तर आमच्या बहिणीसुद्धां हेंच उत्तर देतील. हिंदु कोड पास झाल्यावर मुलांमुलींना समान अधिकार मिळणार आहे असं म्हणतात. आमच्या आप्पासाहेबांच्या न्यायबुद्धीनें तो आधींच सर्वांना बहाल केला आहे.

आमच्या घराण्याचं नांव उभ्या महाराष्ट्रांत अग्रेसर केलें तें तात्यासाहेबांनीं. आमच्या आईनेंहि खूप लौकिक मिळवला. नवीन पिढींत चांगलं बोलणाऱ्या स्त्रिया मीं पाहिल्या आहेत, पण तरीहि अजूनसुद्धां आमची आई जें वक्तृत्व गाजवते तें कुणालाहि ऐकण्यासारखं आणि वेगळंच वाटेल. पुढच्या पिढींतहि *दत्तुकाका आणि पुण्याची अक्का यांनीं घराचा नांवलौकिक कायम राखला. तसं पाहिलं तर आमच्या आप्पासाहेबांनीं असली कीर्ति मुळींच मिळवली नाहीं; पण घरांतल्या आम्हां सर्वांनाच नव्हे तर आप्पासाहेबांच्या सहवासांत आलेल्या सर्वांना नकळत त्यांच्यापुढें नम्र व्हावंसं वाटतं. ते प्रेम करतात तें निःशब्द असतं, म्हणूनच समजून घ्यावं लागतं. ते सहसा रागावत नाहींत; पण त्यांच्या रागाची भीति वाटते. ते विचारल्याखेरीज सहसा उपदेश करणार नाहींत किंवा सल्ला देणार नाहींत, पण त्यांचं निदान—विशेषतः मनुष्यस्वभावाबद्दलचं—अचूक असतं. त्यांनीं घरांत कुणाचं आणि काय केलं नाहीं ? आमचे थोरले चुलते नाना दुर्दैवानें अल्पायुषी झाले. तेव्हांपासून वडीलकीच्या नात्यानं ज्यांचं ज्यांचं म्हणून कांहीं करावं लागलं त्यांचं त्यांचं शक्य तें सर्व कांहीं न बोलतां त्यांनीं केलं आहे.

त्यांना देवदेवतार्चन किंवा पोथ्यापुराणांचा नाद नाहीं. तरीहि म. म. पाठकशास्त्र्यांसारखा अधिकारी प्रवचनकार असला कीं त्यांच्या प्रवचनांना ते हटकून हजर असायचेच. त्यांनीं प्रवासाच्या निमित्तानें

---

* प्रा. द. के. केळकर व डॉ. कमलाबाई देशपांडे.

यात्राहि पुष्कळ केल्या. त्यांची देवावर श्रद्धा आहे. तरी पण अंतरींची ज्योत जागती ठेवायला त्यांना कर्मकांडाची जरूर भासत नसावी. गुरु अनेकजण करतात, पण गुरूवर निस्सीम श्रद्धा आणि त्याच्या उपदेशाचं आयुष्यभर पालन करणं ह्या गोष्टी सोप्या नाहींत. त्यांनीं श्री. गोंदवलेकरमहाराज या सत्पुरुषाला आपला गुरु मानलं आणि त्यांनीं सांगितलेला 'सत्संग' आयुष्यभर मिळवायचा प्रयत्न केला. संसारांत नेहमींच 'सत्संग' साधतो असं नाहीं; पण जो सहवासांत आला त्याचा बरा गुण तेवढा बघायचा अशा संवयीनें त्यांनीं पर्यायानें 'सत्संग' नेहमींच साधला.

खानदेशांत रेव्हेन्यू अधिकारी असतांना त्यांनीं एका पाटलाला एकदां मारलें होतें असें तेच सांगतात; पण तेवढा अपवाद वगळला तर खानदेशांतल्या बावीस आणि मिलमधल्या सतरा वर्षांच्या नोकरींत त्यांनीं कुणाला अद्वातद्वा शिव्या देखील दिलेल्या नाहींत आणि राग मनांत ठेवून त्यांनीं अकल्याण तर कुणाचंच केलं नाहीं. स्वच्छ चारित्र्य, न्याय्य वागणूक आणि नेकीनें काम या गुणांनीं त्यांनीं खालपासून वरपर्यंत सर्वांकडून नेहमीं धन्यवादच मिळविले. पेन्शन घेतल्यानंतर कालांतरानें ते खानदेशांतल्या एका खेड्यांत गेले. तिथल्या पाटलानें त्यांना आवर्जून मेजवानी दिली. तो म्हणाला, 'साहेब, मामलेदार पुष्कळ येतात, त्यांची सरबराई आम्हांला करावीच लागते, पण तो पेन्शनींत गेला कीं आमची दृष्टि बदलते. पण तुमची गोष्टच वेगळीं आहे. तुमची सद्भावना आम्ही विसरूंच शकणार नाहीं.' एका पाटलानें तर त्यांच्यावर एक उत्तम कवन करून पाठविलें होतें. आमचे आप्पासाहेब सार्वजनिक आयुष्यांत चालू अर्थानें 'ख्यातनाम' झालेले नाहींत, पण त्यांची पुण्याई त्यांनीं कशी संपादन केली तें आम्हांला अशाच गोष्टींवरून दिसतें आणि म्हणूनच त्या आम्हांला वारंवार आठवतात.

त्यांचें आणि तात्यांचें प्रेम अबोल पण आत्यंतिक होतें. आप्पासाहेब फार बोलके नाहींत आणि तात्यांना भावना फारशा शब्दांनीं वर्णन करून सांगायची संवय नव्हती. तरीपण दोघांनाहि एकमेकांना भेटल्यावांचून चैन पडत नसे. आमच्या घरीं तात्या यायचे असले म्हणजे आमचे वडील आधीं कलेक्टरला खबर देत असत. पुढें धुळ्यास गेल्यावर तर आप्पासाहेब उन्हाळ्यांत पुण्यास मुद्दाम येऊन रहात. तात्यांच्या नात्यामुळें आप्पासाहेबांना नोकरींत बढती आणि पगारवाढ यांत फार नुकसान सोसावें लागलें; पण त्यामुळें त्या दोघां भावांच्या परस्परसंबंधांत कधींच अंतराय आला नाहीं. स्कॉलरशिपचा प्रश्न निघाला म्हणजे तात्या म्हणत, ' मी कधींच स्कॉलर नव्हतों; पण आमच्या घरांत खरे स्कॉलर आप्पासाहेब होते हें तुम्हां मुलांना कुठें ठाऊक आहे ! ' तात्यांच्याबद्दलची आप्पासाहेबांची भावना तर ' त्यांना कुठें ठेवूं आणि कुठें नको ' अशी होती. आप्पासाहेब उन्हाळ्यांत घरीं रहायला यायचे म्हटलें कीं त्यांच्या खोलीची व्यवस्था नीट झाली ना असें तात्यांनीं विचारायचें आणि ताई तर आप्पासाहेब येणार म्हणून हरखून जायच्या.

तात्या एकाएकीं निधन पावले. ती वार्ता आप्पासाहेबांना प्रथम कळली रेडिओवरून. नंतर ते आणि आई यांना माणूस पाठवून पुण्यास आणलें. तोंवर आमच्या ताईची दशा वाऱ्यानें उन्मळून पडलेल्या केळीसारखी झाली होती. त्यांचं सांत्वन तरी कोण करूं शकणार होतं; पण आप्पासाहेब आले आणि म्हणाले, ' दुर्गा, अग तात्या गेला तरी मी आहे ना ! केळकरांच्या घरांत तूं आलीस त्याच्या आधींपासूनच तूं माझी बहीण होतीस हें तुला आठवतं ना ? ' मनांतलं सगळं दुःख गिळून हा धीर त्या क्षणीं ताईना द्यायला आप्पासाहेबांवांचून कोण समर्थ होतं ! यानंतर दोनच वर्षांनीं आमच्या घरावर आणखी एक अशीच आपत्ति कोसळली. आमच्या कुसुमताईचे

पति* बाबुराव भावे हृदयक्रिया बंद पडून अवघ्या त्रेचाळिसाव्या वर्षी धुळें येथें एकाएकी निवर्तले. ती बातमीसुद्धां प्रथम कळली जळगांवला आप्पासाहेबांना. ८० वर्षांचे आप्पासाहेब, पण मन घट्ट करून धुळ्यास गेले आणि इतर माणसें जमेपर्यंत तिथली सर्व व्यवस्था त्यांनीं केली. असला प्रसंग वैऱ्यावरसुद्धां येऊं नये; पण अशा प्रसंगांतसुद्धां अत्यंत घट्ट मनानं त्यांनीं धीर धरलेला पाहिला कीं धार्मिक ग्रंथांचं फारसं वाचन न करतांहि त्यांनीं मनाला जी अलिप्ततेची शिकवण दिली आहे ती केवढी उदात्त आहे तें कळतं.

बारा वर्षांपूर्वी माझी सर्वांत थोरली बहीण निधन पावली. ४७ सालीं तात्यासाहेब गेले. आणि लगेच दोन वर्षांनीं माझे मेव्हणे भावे निधन पावले. पहिले दोन धक्के जगरहाटीकडे लक्ष देऊन आप्पासाहेबानीं सोसले. तिसऱ्या धक्क्यानें मात्र – त्यांनीं तें दुःख गिळायचा प्रयत्न केला तरी – ते खचले. त्यांच्या चेहऱ्यावर आणि प्रकृतीवरहि त्याचा परिणाम दिसूं लागला; पण ते मनाचे एकंदरींत खंबीर यांत शंकाच नाहीं. ५० सालीं ते नेहमींप्रमाणें उन्हाळ्यांत पुण्यास येऊन गेले. त्यांना स्वतःला फार चालवत नव्हतं तर त्यांनीं त्यांच्या इष्टमित्रांना माझ्या घरीं भेटायला बोलावलं आणि नेहमींप्रमाणें गप्पागोष्टी केल्या. ५१ सालीं मेमध्यें माझ्या एका बहिणीचें, उषाचें, लग्न झालें त्या निमित्तानें आम्ही सर्व वडिलांना भेटायची संधि साधून घरीं जमलों. त्या वेळीं त्यांनीं आपल्या लग्नाच्या ५०व्या वर्षाचा वाढदिवस करून सर्व मुलां-नातवंडांना मेजवानी दिली आणि सर्वांना उपदेश करून आशीर्वाद दिला. आमच्या घरांत

* जनार्दन हरि भावे दादरच्या मॉडर्न केमिकल वर्क्सचे मालक. यांनीं पोटॅशियम् परमँगनेट तयार करण्याकरितां धुळें येथें कारखाना काढला. पण व्यापारी दृष्टीनें त्याचें उत्पादन यशस्वी होण्यापूर्वीच ते निधन पावले.

अनेक समारंभ झाले पण या समारंभांत जी उदासपणाची छाया होती ती पूर्वी अशी कधींच नव्हती.

आप्पासाहेबांनीं एकूण ३२ वर्षें नोकरी केली; पण नंतरहि पुन्हा १७ वर्षें धुळ्यास प्रताप मिलमध्यें लोकल एजंट म्हणून नोकरी केली ती वयाच्या ७२ वर्षांपर्यंत. नंतर मात्र ते जळगांवच्या घरीं येऊन विसांवा घेत आहेत. त्यांनीं वृद्धावस्थेंत धुळ्याची नोकरी केली म्हणूनच आम्हां मुलांचें शिक्षण पुरें होऊं शकलें. ते मात्र म्हणतात कीं, मला एकसारखें काम होतें म्हणूनच मी इतका दीर्घायुषी झालों. सतत काम करणें आणि कसलीहि चिंता न करणें हेंच माझ्या दीर्घा-युष्याचें रहस्य आहे.

त्यांनीं नोकरी नेहमींच उत्तम केली; पण नोकरींत असतांनाहि ‘सहकारी बॅंक’ या विषयाचा व्यासंग केला. धुळ्याची राजवाडे बॅंक नांवारूपाला आणली आणि त्या विषयावर लेखनहि केलें. याच विषयामुळें त्यांचा आणि श्री. वैकुंठलाल मेहतांचा परिचय आणि स्नेह झाला. वैकुंठभाई अजूनहि त्यांना भेटतात तेव्हां त्यांच्या वागण्यांत तो प्रेमादर दिसतो.

साहित्यक्षेत्रांत चार पुस्तकें लिहिणारा जेवढा नामवंत होतो, तुरुंगांत जाऊन आलेला तेवढा देशभक्त होतो त्याच्या दशांश कीर्ति-सुद्धां माझ्या वडिलांना मिळालेली नाहीं आणि तिची त्यांना अपेक्षाहि नव्हती. पण अशा व्यक्तीच समाजाच्या खऱ्या घडणीला मदत करतात. ज्यांना समाजाकरतां खरोखर कांहीं करावेंसें वाटतें त्यांना अशा व्यक्तींची ओळख अधून मधून अवश्य व्हायला हवी. अप्पासाहेब जेव्हां सांगतात कीं, ‘मी अधिकारावर असतांना एक पैसा तर खाल्ला नाहींच पण उलट दोन अडीच लाख रुपये माझं वजन खर्चून श्रीमंत व्यक्तींकडून सत्कार्याला मिळवून दिले आहेत’ तेव्हां आम्हांला खरोखरीच त्यांचं आयुष्य कारणीं लागलं असंच वाटतं.

लहानपणीं हातगाडीवरून पाणी भरून त्यांनीं आईला मदत केली, मिरजेपासून कोल्हापूरपर्यंत रात्रभर पोस्टाच्या टांग्यांत बसून प्रवास करण्यासारखे कष्ट करून विद्या केली, कुटुंबाचें कर्ज फेडून आईबापांचे पांग फेडले, आप्तेष्टांना करतां येईल तेवढी मदत केली, सार्वजनिक कार्यांना हस्तें, परहस्तें मदत केली, मुलांचं शिक्षण पूर्ण करून त्यांना मार्गाला लावून दिलं आणि हें सर्व करीत असतांना जीवन समाधानांत, आनंदांत व्यतीत केलं. घोड्यावर बसणं, पोहणं, पायीं फिरणं, प्रवास करणं, नाटक व चित्रपट पहाणं आणि संगीत मैफलींचाहि वेळप्रसंगीं आनंदानें रसास्वाद घेणं, मित्रमंडळी जमवून गप्पा, पत्ते, चहा आणि सिगरेट यांचीहि मौज लुटणं या सर्व गोष्टी त्यांनीं केल्या. स्वतः फार बोलायला नको असलं तरी मुलांच्या वादविवादांत श्रोत्याची व क्वचित् न्यायाधीशाची भूमिकाहि त्यांनीं कौशल्यानें पार पाडली आहे; घरीं विवाहादि प्रसंगीं आमचे बरोबरीचे मित्र जमले म्हणजे जातां-येतां आमच्या अंगावर सिगरेटचीं पाकिटेंहि त्यांनीं टाकली आहेत; आणि ८२ व्या वर्षीं २४ वर्षांच्या बाबूबरोबर फिरायला जाऊन त्याच्या मित्रांना हॉटेलांत चहापार्टी देऊन स्वतः एका बाजूस बसून लेमोनेड पीत त्यांच्या आनंदांतहि ते सहभागी झाले आहेत.

श्रीपाद कृष्णांचा आणि त्यांचा स्नेह होता आणि त्यांच्या गप्पा खूप रंगत आणि अगदीं परवांपर्यंत अत्र्यांचे अनेक विनोदी लेख नवयुगांत येत ते वाचून ते पोटभर हंसलेहि आहेत. दोन वर्षांपूर्वीपर्यंत त्यांना स्वतंत्रपणें हिंडतां येई तोंपर्यंत ते वेळ घालविण्याकरितां विनोदी चित्रपट मुद्दाम पहायला जात. साहित्यचर्चेंतील श्लेष त्यांनीं समजून घ्यायचा प्रयत्न केला नाहीं तरी खेळाडू मनोवृत्ति आणि रसग्राही बुद्धि त्यांच्याजवळ जरूर आहे. गेल्या वर्षी ते आजारी पडले आणि आतां ते अंथरुणाला खिळून आहेत तेव्हांपासून मात्र एक तऱ्हेचा अलिप्तपणा त्यांच्या वृत्तींत आला आहे आणि आम्हांला तो

कितीहि दुःसह होत असला तरी तो अपरिहाय आहे हेंहि आम्हांला कळतं.

लहानपणीं आप्पासाहेबांच्याजवळ असे आम्ही क्वचितच जात असूं. पुष्कळसें काम आईकडून आणि तिच्या मार्फतच व्हावयाचं. आम्ही जसजसे मोठे होत गेलों तसतसं हें अंतर कमी होत गेलं तरी अजीबात लोपलं मात्र नाहीं. ते 'उंची'नें खरोखरीच फार मोठे आहेत ही आम्हां सर्व मुलांची भावना आहे. त्या एका बाबतींत तरी आम्हां सर्वांचं एकमत आहे. १९४३ साली माझ्या अविनाशचा जन्म जळगांवलाच झाला. त्याचं जन्मघर म्हणजे आजोळ स्टेशनलगत असून आमच्या घराच्या वाटेवर होतं; पण मी जेव्हां जळगांवला अविनाशला प्रथमच बघायला गेलों तेव्हां आधीं घरीं जाऊन पितृदर्शन घेतलं आणि मगच माघारीं येऊन मीं पुत्रमुख बघितलं. १९४९ साली चर्चगेटपासून चेंबूरपर्यंत माझ्या भावंडांपैकीं किंवा चुलत्यांपैकीं कुणाचें ना कुणाचें तरी बिऱ्हाड होतें. आप्पासाहेब मुंबईस आले कीं त्यांनीं आपल्या घरीं यावें आणि त्यांची सेवा घडावी म्हणून सर्वांची अहमहमिका लागायची. तेव्हां बाबू म्हणायचा 'His Majesty,' our Father has his embassies, spread all over Bombay, from Churchgate to Chembur. And wherever he goes he automatically assumes full powers.' आतां शरीरानें ते दुबळे झाल्यापासून मात्र त्यांच्यांतलं आणि आमच्यांतलं उरलं सुरलं अंतरहि नष्ट झालं आहे. कारण एखाद्या लहान बालकासारखीच त्यांची शुश्रूषा करावी लागते. शुभदा-श्रीकरला जितक्या हळुवारपणानें मी कुरवाळतो तितक्याच अलगदपणानें आप्पासाहेबांना आतां उठवून बसवून मी चहा पाजतों आणि आतां त्यांना असाच चहा पाजावा लागतो. त्यांचे हातपाय चेपून द्यावे लागतात, त्यांना आंघोळ घालावी लागते आणि एकट्या आईच्या अगर आत्या-

बाईच्या हातून हें रेटणार नाहीं हें आम्हांला माहीत आहे म्हणूनच एक कोणी तरी सून तेथें रहाते आणि आम्ही आळीपाळीनें जळगांवची यात्रा करीत असतों.

असाच मी देखील केव्हां तरी जात असतों आणि मग मला गाडींत स्वस्थपणें झोंप येत नाहीं. स्वप्नांतहि मला घर दिसतं, आई दिसते, आत्याबाई दिसतात, अपंग कमा दिसते आणि जळगांव केव्हां येईल असें होतें. आठवणींच्या वारूवर बसून मन गत काळांतून भ्रमण करतं आणि कल्पनेच्या वारूवर बसून 'या वेळीं आई जागी असेल का ?' असा विचार करीत असतं. चाळीसगांवला गाडी आली कीं मला माझं बाळपण आठवतं. सुखाचे दिवस ज्यांच्या पुण्याईमुळं उपभोगले ते आप्पासाहेब कसे असतील हें मनांत येतं आणि म्हणूनच जळगांवला गाडी थांबली कीं स्टेशनवर चहा देखील न घेतां मी लगबगीनें घरीं जातों. वळणावरचा मारुति दृष्टीस पडला कीं मनोमन त्याला विचारतों कीं, 'मारुतिराया, घरची खबर ठीक आहे ना ?' पण तो बोलत नाहीं आणि मला तरी कुठं उत्तराची अपेक्षा असते ! माझं घर आलेलं असतं, आणि मला घरीं पोंचायची घाई झालेली असते. याच घरांत मागल्या चौकांत आत्याबाईंना स्वप्नांत विठोबा-रखुमाईचं दर्शन घडलं होतं, याच घरांत धैर्याचा कोट बांधून रहाणारी माझी आई आहे, याच घरांत लिंबाएवढ्या भातांत सगळ्या घराला पोटभर जेवण घालणाऱ्या आत्याबाई आहेत, याच घरांत आम्हां सगळ्या भावंडांपेक्षां जास्त असं तिच्या 'साहेबां'वर निस्सीम आणि निरपेक्ष प्रेम करणारी कमाताई आहे आणि याच घरांत आम्हां सर्वांच्या उत्कट प्रेमाचं एकमेव लक्ष्य झालेले आप्पासाहेब आहेत. म्हणून मी चटकन् घरांत शिरतों आणि ओट्यावर चढून घंटा वाजवतांनाच हांक मारतों, 'आई !'

प्रसाद, जानेवारी १९५३





११

# दिवाळी अशी येते

पावसाळा संपतो आणि दिवाळी जशी जशी जवळ येते तसतसा आकाशाचा रंग पालटूं लागतो. संध्याकाळच्या वेळीं बघितलें तर आकाशांत ढग दिसतात पण ते मावळत्या सूर्याच्या तेजांत न्हाऊन निघालेले आणि सोनेरी कडांचे असतात. ते तिथें असतात पण त्यांचें अधिराज्य संपलेलें असतें. आणि ते आपले उगीचच रेंगाळत आहेत असें वाटत असतें !

चातुर्मासांत वास्तविक कितीतरी सण येतात पण दिवाळीची गंमत कुठल्याच सणाला नाहीं. मंगळागौरीचीं जाग्रणें, गणपतीची आरास आणि उत्सव, हादग्याचीं गाणीं हे सगळेच कार्यक्रम आपापल्या परीनें गाजणारे असतात. तरीपण दीपोत्सवाची गंमत त्या कशांतच नसते. मग जेव्हां नवरात्र संपून दसरा उजाडतो तेव्हां दिवाळी खरेंच जवळ आली असें वाटून सगळेजण तिची वाट पहायला लागतात. कोजागिरीचें चांदणें मध्येंच नवोढेची हुरहूर वाढवून जाते. एखादी माहेरचें बोलाविणें यायची वाट पहात असते तर माहेरीं आलेली, पति दिवाळ-सणाला येणार म्हणून दिवस मोजत असते. माणसें एकेक दिवस सुखाच्या अपेक्षेनें मोजत बसतात म्हणून तर सूर्याला दिनमणि हें नांव मिळालें नसेल ना?

आश्विनांत धनत्रयोदशी येते. बायकांचीं न्हाणीं होतात. मुलांकरितां फटाके येतात. पणत्यांतून तेलवात होते. त्या रात्रीं प्रथम दिवे लागतात. तरी देखील खरी दिवाळी दुसरे दिवसापासून म्हणून घरांत तळण सुरूच असतें आणि रात्रीं उशीरांपर्यंत घरांत बायकांचीं कामें आणि पुरुषांचे पत्ते गाजत असतात. मोठ्या माणसांबरोबर आपणहि जागत रहावें असें मुलांनाहि वाटतें. वडील माणसें त्यांना सारखीं म्हणत असतात, ‘ अरे, उद्यां लवकर उठायचें आहे, तुम्ही आज लवकर निजा. ’ पण तीं ऐकत नाहींत. कारण त्यांना ‘ दिवाळी कशी येते ’ तें पहायचें असतें. गेले कित्येक दिवस ताईला आणि बाबूला दादा सांगत असतो कीं ‘ दिवाळी आज स्टेशनपर्यंत आली, आज गल्लीपर्यंत आली, आज दाराबाहेरच्या आंब्याच्या झाडापर्यंत आली, आतां उद्यां ती घरांत येणार आहे. ’ ती घरांत कशी येते तें ताई-बाबूला पाहायचें असतें. म्हणून तीं दोघें पायरीवर जागत बसतात. तीं वडील माणसांचें

ऐकत नाहींत. पण झोंप त्यांचें न ऐकतां त्यांचेवर हळूहळू आपले मायपाश पसरते.

पण जें दिवाळीचें आगमन त्यांना जागतेपणीं दिसत नाहीं तें त्यांना स्वप्नांत दिसतें. पंख पसरून आणि एका हातांत आकाश-दिवा आणि दुसऱ्या हातांत फुलबाजी घेऊन दिवाळी परीच्या रूपांत झेंपावत येतांना त्यांना दिसते. दुसऱ्या दिवशीं लक्ष्मीपूजन. घरादारावर लक्ष्मीची कृपा असावी, दिवाळी सुखसमृद्धीची जावी म्हणून लक्ष्मीची साग्रसंगीत पूजा त्या दिवशीं व्हायची असतें. आणि पूजेची पूर्वतयारी म्हणून सडासंमार्जन करून तिच्या स्वागताकरितां रांगोळी काढायचें काम घरांतल्या सुनेचें किंवा मोठ्या मुलीचें असतें. तिसऱ्या दिवशीं पाडवा येतो. त्या दिवशीं मुलगी वडिलांना ओवाळते आणि ओवाळणी घेतें पण खरें महत्त्व असतें तें पत्नीनें पतीला ओवाळून त्याच्याकडून ओवाळणी घ्यायचें ! गृहिणी या नात्यानें तिनें वर्षभर त्याचें 'घर' संभाळलेलें असतें त्याच्या-बद्दलची जाणीव व्यक्त करायची त्याला संधि मिळते. आणि जेव्हां एखाद्या नवपरिणीत दंपतीला पाडवा साजरा करायचा असतो तेव्हां संधि साधून, आसपास कोणी नाहीं असें बघून एका हातांतून एक अंगठी हळूंच दुसऱ्या एका नाजुक बोटांत सरकते. चौथा दिवस असतो भाऊबीजेचा. आज भावाला आंघोळ घालायची, जेवायला घालायचें आणि ओवाळायचें. आणि मग भाऊ बहिणीला प्रेमानें ओवाळणी घालतो. पण एखादेवेळीं असें घडतें कीं बहीण वाट पाहून थकते. भाऊ कांहीं येत नाहीं. शेवटीं ती चंद्रालाच भाऊ समजून ओवाळायला जाते. तिला भास होतो कीं चंद्र हंसतो आहे. आणि तें खरेंच असतें. कारण तिचा भाऊ अचानक येऊन मागें उभा आहे तें चंद्र पहात असतो. तिला चाहूल

लागते आणि ती मागें पहाते तों भाऊ मोठ्यानें हंसत असतो. मग तिला पण हंसूं फुटतं. आणि त्यांच्या आनंदांत चांदोबाहि सामील होतो तेव्हां त्यांचा आनंद गगनांतहि मावत नाहीं.

वाङ्मय-शोभा,
दिवाळी अंक, १९५५



प्रकाशक व महाराष्ट्र टाइम्स् यांच्या सहकार्यानें
" [illegible] योजनेतील पुस[illegible]

